# सुलभ वेद प्रकाश

लेखक

कवि विशारद केशवकृष्ण हळबे

नवापुरा. वाडी. बडोदें.

प्रकाशक

सर्वाधिकारी. गोवर्धन मठ. जगन्नाथपुरी.

२४।१०।२ इसन. १९४८

स्वाधीन ठेविले आहेत.

श्री

# समर्पण.

श्रीमत्परमहंस-परिव्राजकाचार्य-वैदिकमार्गप्रवर्तक-
श्रीगोवर्धनमठाधीश्वर-परमपूज्य-जगद्वंद्य-
श्रीमज्जगद्गुरु-श्रीमच्छंकराचार्य—
श्री १११०८ श्रीयोगेश्वरानंद [illegible]
यांच्या चरणीं
हें पुस्तक
सर्वहक्कांसहित-निरभिमानवृत्तीनें-कृतज्ञतापूर्वक
समर्पण केलें आहे.



लेखक
[illegible]

बडोदें. वाडी. नवापुरा
तारीख ३-९-१९४७

## प्रस्तावनेदाखल दोन शब्द.

१

विविध दुःखांचें उन्मूलन करणें, हाच सर्व धार्मिक ग्रंथांचा सामान्य हेतु असतो. परंतु धार्मिक ग्रंथांचा विस्तार किती ओह, व त्यांत काय सांगितलें आहे हेंच जर मुळांत माहित नसेल तर दुःख निरसन होणार तरी कसें? व दुःखनाहींसे न झालें तर सुख तरी कसें मिळणार? या साठी सर्व जगाचा धर्म ज्या मूळ ग्रंथांत सांगितला आहे त्या सनातन वेदवाङ्मयाचें [सान] ज्ञान सर्वांना सुलभ रीतीने मिळावें व वेदाचा विस्तार किती आहे याची

सर्वांना –

थोडक्यांत कल्पना यावी हाच या
ग्रंथाचा हेतु आहे. वेद हें आपल्या
पूर्वजांचें अमूल्य धन आहे व त्याची
संपूर्ण मालकी आपल्याकडेच आहे.
या ज्ञान धनावर प्रकाश पाडून तें
सर्वांना सुलभ व्हावें या साठींच
हा लहानसा ग्रंथ जनताजनार्दन
चरणीं अर्पण करीत आहे.

नवापुरा. वाडी.
बडोदें ता.
३-८-१९४९

लेखक.
काविवि.शारद
[illegible]

# अनुक्रमणिका.

१ वेद.

हिंदु धर्माचा मूळ आधार ग्रंथ 'वेद' आहे. वेदांना 'श्रुति' म्हणतात. सनातन धर्माचा उगम वेदापासुन झालेला आहे. वेदाची योग्यता इतर धर्मांच्या धर्मग्रंथांपेक्षां पुष्कळ परीनें अधिक आहे. जगांतील सर्व ग्रंथांत ऋग्वेद अथवा ऋक् संहिता हा अत्यंत प्राचीन ग्रंथ आहे. त्याच्या तोडीचा एकही ग्रंथ जगांत नाही. जगाच्या उत्पत्ती बरोबरच वेदाची उत्पत्ती झाली असें वर्णन ऋग्वेदांत आहे. कमींत कमी आठ हजार वर्षापूर्वीचा हा ग्रंथ आहे असें मानण्यास हरकत नाही. वेद म्हणजे एखादा विशिष्ट ग्रंथ नव्हे. वेद हें वाङ्मय आहे. या वाङ्मयाची उत्पत्ति प्रणवा पासुन म्हणजे ॐ कारा पासुन झालेली आहे. या प्रणवास सूक्ष्मवेद अथवा मूळवेद असेंही म्हणतात. या वेद वाङ्मयांत प्रार्थनेची सूक्तें, यज्ञयागाच्या उपयोगाची माहिती,

आचारांचे नियम, तत्त्वज्ञान, व्यावहारीक ज्ञान, वगैरे अनेक प्रकार आहेत. त्या सर्वांचें वर्गीकरण करून एकंदर वाङ्मयाचे (१) प्रार्थना विभाग (२) यज्ञ विभाग (३) गान विभाग, व (४) व्यवहार आणि आभिचार विभाग असे चार विभाग बनवून त्यांना अनुक्रमें ऋग्वेद (प्रार्थना), यजुर्वेद (यज्ञ), सामवेद (गान) व अथर्ववेद (आभिचार) अशीं नांवें दिलेलीं आहेत. ऋक्, यजुः व साम यांना वेदत्रयी म्हणतात. अथर्ववेद हा मागाहून झालेला आहे.

वेदाची भाषा संस्कृतच आहे, परंतु त्या तऱ्हेची भाषा पुढें सुरू न राहिल्याकारणानें लौकिक संस्कृत भाषेहून ती बरीच भिन्न वाटते. ती भाषा समजण्यासाठी फार कठीण आहे, संस्कृत उत्तम समजलें तरी वेदाचा अर्थ कळतोच असा अभिमान करणें व्यर्थ ठरतें. वेद हे स्वतः सिद्ध

आहेत. आपल्या महान् ऋषींनीं वेदाचा पदच्छेद अथवा पदपाठ, वेदाचा कोश, वेदाचें व्याकरण, वैदिक शब्दांचे खुलासे, वैदिक शब्दांची व्युत्पत्ति वगैरे सर्व गोष्टी पूर्वीच लिहून ठेवलेल्या आहेत; तरी देखिल वेदाचा अर्थ पूर्णपणें लावतां येत नाहीं, इतकी वेदाची भाषा जुनी व दुर्बोध आहे; ~~तथापि~~ व्याकरण आणि मिमांसा यांच्या अध्ययनानें वेदाचा अर्थ बराचसा करूं शकतो.

वेद अपौरुषेय आहेत असें म्हणतात त्याचें कारण असें कीं त्यांत जी माहिती दिलेली आहे त्या माहितींत पुरुषांच्या कृतीचा दोष कोठेंही आढळत नाहीं. सर्व काव्यरचना ईश्वरभक्तीच्या स्फूर्तीनं, निस्कामपणानें व अंतःकरणाच्या

तळपवीनें केलेली आहे. ईश्वराच्या ठिकाणीं मनाचा लय करून अंतःस्फूर्तीनें जे सहज उद्गार निघतात ते अपौरुषेय ठरतात, कारण ते ईश्वर प्रणीत असतात. तीच स्थिति वेदांची आहे.

वैदिक वाङ्मय हें छंदोबद्ध व गद्य अशा दोन्ही प्रकारचें आहे. छंदोबद्ध रचनेला 'ऋचा' हें नांव आहे. अनेक ऋचांचे कलाप बनविलें आहेत त्यांना 'सूक्त' ही संज्ञा आहे. ऋचा आणि त्यांची सूक्तें हा एक प्रकार; यजुः किंवा गद्यरूप मंत्र हा दुसरा प्रकार. त्याच प्रमाणें मंत्र आणि ब्राह्मण हाही वेदविभागाचा आणखी एक प्रकार आहे. वेदाच्या कांहीं भागाला

मंत्र ही संज्ञा आहे. मंत्र हा छंदोबद्ध अथवा गद्यरूप अशा दोन्ही प्रकारचा असतो. मंत्रांचा विनियोग म्हणजे त्यांचा उपयोग ज्यांत सांगितलेला असतो, अथवा त्या मंत्राचें ज्यांत विवेचन केलेलें असतें तें बहुधा गद्यांत म्हणजे सरळ बोलण्याच्या भाषेंत असतें, अशा विवेचनात्मक ग्रंथांना 'ब्राह्मण-ग्रंथ' ही पारिभाषिक संज्ञा आहे. ब्राह्मणग्रंथ हे स्वतंत्र ग्रंथ आहेत. या ब्राह्मण ग्रंथांना हल्लीं कर्मकांडाचे ग्रंथ म्हणतात. मंत्रांच्या एकीकरणाला संहिता म्हणतात.

वैदिक वाङ्मयाचे सहा विभाग पडतात. १ ऋग्वेदकाळ, २ कर्मकांडकाळ, ३ उपनिषत् काळ, ४ सूत्रकाळ, ५ स्मृतिकाळ व ६ षड्शास्त्र काळ.

वेदा मध्यें प्रत्येक शब्दांतील अक्षराला कोणता तरी स्वर असतो. स्वर म्हणजे ठरीव अक्षरावर कमीजास्त जोर देऊन शब्दोच्चार करण्याची ~~पद्धति~~ पद्धति. स्वर ही संज्ञा दोन प्रकारच्या अक्षरोच्चार पद्धतींना लावतात. पहिली ह्रस्व, दीर्घ आणि प्लुत किंवा प्रदीर्घ ह्या व्याकरणांतल्या स्वरोच्चाराच्या पद्धतीला; आणि दुसरी उदात्त, अनुदात्त आणि स्वरित या शब्दोच्चाराच्या पद्धतीला. या पद्धतींना (ला) स्वर प्रक्रिया, स्वर पद्धति किंवा स्वन पद्धति ही नांवें आहेत. स्वरभेदामुळें अर्थभेद ही संभवतो.

वैदिक वाङ्मय हें मुख्यतः प्राचीन आर्यांचें

तत्त्वज्ञान, त्यांची यज्ञसंस्था, त्यांचे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध आचार यांचें प्रतिपादन करणारें तर आहेच, पण त्या शिवाय आर्यांच्या वैयक्तिक, कौटुंबिक, सामाजिक व राष्ट्रीय जीवन क्रमावरही तें प्रकाश पाडणारें आहे. हें आर्यांचें पिढीजाद ज्ञान धन आहे.

विष्णु पुराणांत वेद मूळचा एकच असुन तो चारपादांनी युक्त होता व त्याची संख्या एक लक्ष होती असें सांगितलें आहें. व्यासांनीं तो चार ठिकाणीं विभागला, व त्या मुळें निरनिराळे चार वेद झाले. मानवी उन्नति हा वेदाचा मूळ हेतु आहे व उन्नति ही

कर्म आणि उद्योग यांवर अवलंबुन असते.
कर्म आणि उद्योग या दृष्टीनें यज्ञसंस्था
ही अत्यंत महत्वाची संस्था आहे. हल्लीं
त्या प्रमाणें कांग्रेस, महासभा, औद्योगिक
परिषदें, पदार्थसंग्रहालयें, पुस्तकालयें,
कारखानें हीं सर्व राष्ट्राच्या उन्नतिकारक
चळवळीची द्योतक आहेत तशीच, पण
किंबहुना त्या पेक्षां जास्त महत्वाची अशी,
ही यज्ञसंस्था व त्या संस्थेची निरनिराळी
अंगें व उपांगें हीं समाजाच्या एकीकरणा
साठीं व उन्नति साठीं आर्यांनीं स्थापन केली;
व तद्द्वारा धर्माच्या नांवाखालीं आर्यलोक
समाजाचें संघट्टन शांततेनें करूं लागले.
अशा या यज्ञसंस्थेचे मुख्य चार विभाग

आहेत. पहिला होत्र, दुसरा आध्वर्यव, तिसरा औद्गात्र, व चवथा ब्रह्मत्व.



होत्र म्हणजे ~~उद्दिष्ट~~ उद्दिष्ट देवतांना आदर पूर्वक बोलावणें, व त्यांची स्तुति करणें, असें करण्याचें ज्ञान ज्यांत आहे तो ऋग्वेद; असें करणाराला 'होता' हें नांव आहे.

आध्वर्यव म्हणजे हविर्द्रव्यें तयार करून तीं त्यांना (देवतांना) समर्पण करणें; असें करण्याचें ज्ञान ज्यांत आहे तो यजुर्वेद; व असें करणारा तो 'अध्वर्यु.'

औद्गात्र म्हणजे सप्त स्वरांच्या आश्रयानें वैदिक ऋचांचें गायन करून देवतांनां संतुष्ट करणें. असें करण्याचें ज्ञान ज्यांत आहे तो सामवेद; व असें करणारा तो 'उद्गाता.'

ब्रह्मत्व म्हणजे सर्व यज्ञ कर्मावर लक्ष्य
ठेवून तें शक्य तितकें बिनचुक होईल अशी
काळजी घेणें. हें ज्ञान ज्यांत आहे तो
अथर्ववेद; व हें ज्ञान ज्याला असतें तो
'ब्रह्मा.'

या प्रमाणें यज्ञाची चार अंगें असल्या
मुळें व्यासांनीं एकजिनसी अशा वेदाचे
ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद
असे चार भाग केले, व त्या पैकीं ऋग्वेद
हा त्यांनीं 'पैल' नामक शिष्याला, यजुर्वेद
'वैशंपायन' नामक शिष्याला, सामवेद 'जैमिनी,
नामक शिष्याला, व अथर्ववेद 'सुमंतु'
नामक शिष्याला शिकविला. व्यासांच्या
या चारही शिष्यांनीं वेदप्रसाराचें कार्य

शिष्य परंपरेनें उत्तम रीतीनें चालविलें.



यजुर्वेदांत पारंगत अशा वैशंपायनाचे पट्टशिष्य याज्ञवल्क्य मुनि होते. हे याज्ञ-वल्क्य वैशंपायनांच्या बहीणीचे पुत्र होते. म्हणजे हे मामा भाचे होते. मामा भाचांचे नेहमीच खटकतें, त्या प्रमाणें एकदां सामाजिक कार्या साठीं मेरू पर्वतावर हे मामाभाचे म्हणजे वैशंपायन व याज्ञवल्क्य एकत्र जमले असतां त्यांचें कांहीं कारणावरून बिनसलें व वैशंपायनानीं याज्ञवल्क्याला आपली विद्या परत देण्यास सांगितलें. लगेंच याज्ञवल्क्यांनीं सर्व यजुर्मंत्र ओकून टाकले व आपण तेथून चालते झाले.

——— याज्ञवल्क्य निघुन गेल्यावर वैशंपायनांच्या आज्ञेनें कांहीं ब्राह्मणांनीं तित्तिरपक्षांचीं रूपें

घेऊन ते यजुर्मंत्र ग्रहण केले, व ते ब्राह्मण पुढें तैत्तिरीय म्हणून प्रसिध्द झाले.



याज्ञवल्क्य मुनि मेरुपर्वतावरून निघाले ते थेट सूर्याकडे गेले, व त्याच्या जवळून वैशंपायनांनाही अज्ञात असा यजुर्वेद आपणास प्राप्त व्हावा म्हणून त्यांनी सूर्याची आराधना केली. सूर्यनारायणानें घोड्याचें रूप घेतलें व याज्ञवल्क्याला शुक्लयजुर्वेद शिकविला; त्यामुळें वैशंपायनांच्या वेदाला कृष्णयजुर्वेद हें नांव प्राप्त झाले. याज्ञवल्क्यांनीं कण्व, माध्यंदिन ह्या शिष्यांच्या द्वारा या शुक्लयजुर्वेदाचा प्रसार केला.

१८

ग्रंथनिरीक्षणाची अनुबंधचतुष्टयाची जी
पध्दति आहे त्या दृष्टीनें वेदाविषयीं
विचार करतां इष्ट वस्तूची प्राप्ती व्हावी
व अनिष्ट गोष्टीपासुन त्रास न व्हावा या
विषयीं अलौकिक उपाय सांगणारा जो ग्रंथ
अथवा जें ज्ञान त्याला वेद ह्मणतात. हाच
वेदाचा (१) विषय किंवा प्रयोजन आहे.
वेद आणि वेदाचे अधिकारी यांचा (२) संबंध
उपकारक आणि उपकार्य ह्मणजे उपकार
करणारा व उपकार करून घेणारा, असा
आहे. ज्ञानाची लालसा धरणारा हा वेदा
संबंधीं (३) अधिकारी आहे; आणि वेद स्वतः
सिध्द आहेत, त्यांना दुसऱ्या (४) प्रमाणांची
गरज नाही.

वेदांचे ६१३ मंत्र ... (मंत्रांचा 98

क्रमा सहित.). 2 ब्राह्मण ग्रंथ (मंत्रांचा आरण्यके

उपयोग व यज्ञक्रिया, आणि 3 आरण्यके

(तत्त्वज्ञान - आत्मविचार) असे तीन

भाग आहेत. आरण्यकांतच शेवटीं

उपनिषदें येतात. हीं उपनिषदें वेदांच्या

शेवटीं म्हणजे अंतीं असतात म्हणून

त्यांनां (वेद + अंत) वेदान्त म्हणतात.

वेदांचे उपवेदहि आहेत. वेदांचीं अंगें

व उपांगेंहि आहेत. वेदांच्या चार

(1 श्रुति, 2 धृति, 3 विवा, व ४ शक्ति नांवाच्या)

योषिता आहेत; व 1 शिखा, 2 माळा,

3 जटा, ४ रेखा, ५ दंड, ६ रथ, ७ ध्वज, ८ घन

नांवाच्या आठ विकृति आहेत.

श्रीमद्भागवतांत वेदोत्पत्तीची माहिती अशी दिली आहे कीं, पूर्वी ब्रह्मदेव एकाग्र चित्तानें ध्यानस्थ बसला असतां त्याच्या हृदयाकाशांत नादब्रह्म प्रकट झालें. त्या नाद ब्रह्मा पासून परब्रह्म वाचक ॐ कार उत्पन्न झाला. या ॐ कारा पासून वाणीची उत्पत्ति झाली. ॐ कार हेंच मंत्र, उपनिषदें, व श्रुति यांचें बीज आहे. या ॐ कारांत अ, उ, म् अशा तीन मात्रा म्हणजे वर्ण आहेत. ह्या वर्णाच्या योगानें ब्रह्मदेवानें चार वेद उत्पन्न केले. ते वेद त्यानें आपल्या मरीचि प्रभृति -

पुत्रांनां शिकविले, व त्यांच्या पासून त्यांच्या
शिष्यांनीं ते संपादन केले. पुढें व्यासांनीं
चार वेदांच्या चार संहिता सिद्ध केल्या. 20

(बल्वृच)
१ ऋग्वेद नांवाची संहिता त्यानें पैलास
शिकविली. पैलानें ऋग्वेदाच्या दोन शाखा
करून एक इंद्रप्रमितिला व दुसरी

पुढें या वेदाच्या २१ शाखा झाल्या ५५ इतीं
बाष्कलाला शिकविली. त्या पैकीं एक
शाकल शाखा मात्र उपलब्ध आहे.

२ निगद नामक यजुर्वेद संहिता व्यासांनीं
वैशंपायनास शिकविली. वैशंपायनानें ती
चरकाध्वर्यूला व याज्ञवल्क्यांना शिकविली.

यजुर्वेदाच्या — पुढें शाखा १०१ शाखा झाल्या.
३ छंदोग नांवाची सामसंहिता त्यानें (व्यासांनीं)

जैमिनीला शिकविली. जैमिनीनें तिच्या 21
दोन शाखा करून एक आपला पुत्र सुमंतूला व दुसरी
आपला नातू सुन्वाला शिकविली. जैमिनीचा एक सुकर्मा
नामक शिष्य होता त्यानें या साम संहितेच्या
एक हजार शाखा केल्या.
४ आंगीरसी नांवाची अथर्व संहिता
सुमंतूला शिकविली. या सुमंतूनें या
वेदाच्या अनेक (५०) शाखा केल्या.
या प्रमाणें वेदांचा विस्तार झाला.
हल्लीं वेदांच्या मुख्य पांच संहिता आहेत:-
१ ऋग्वेद, २ कृष्ण यजुर्वेद, ३ शुक्ल यजुर्वेद,
४ सामवेद, व ५ अथर्व वेद.

त्या विषयीं आतां आपण थोडासा विचार करूं.

22

—०—

## २ ऋग्वेद.

ऋग्वेद हा ग्रंथ काव्यमय आहे. त्यांत अनेक
सूक्तें आहेत. तीं निरनिराळ्या ऋषींनीं रचिलीं
आहेत. ऋग्वेद हा ग्रंथ आठ हजार वर्षांचा
जुना आहे. वेदांला 'श्रुति' किंवा 'निगम'
असेंही म्हणतात. त्यांत कविप्रतिभा उत्तम दृष्टीस
पडते. त्या काळच्या सुधारणेचें व समाजाचें
चित्रही प्रगतिपर असेंच दिसतें. ऋग्वेदावरून
ईश्वरी ज्ञान, न्याय, तत्त्वज्ञान, आणि व्यवहार
यांचा उत्कृष्ट बोध होतो, व यांतच धर्माचें
मूळ आहे. ऋग्वेदानें 'ऋत' व 'सत्य'
या दोनच शब्दांत सर्व धर्म सांगितला आहे.

ईश्वरभक्ति, न्याय, दया, पवित्रपणा, दुर्जन शासन इत्यादि गोष्टींचा बोध 'ऋत' या शब्दानें होतो, आणि जसें असेल तसें सांगणें याचा सत्यावरून बोध होतो. ऋत आणि सत्य हेंच देवाचें स्वरूप होय, व यांचेंच अवलंबन केल्यास मानव देवरूप बनतो. पृथ्वी ही सत्याच्या आधारावर उभारली आहे. आकाश हें ही सत्यावरच अधिष्ठित आहे. आकाशाचा आधार धर्म आणि धर्मांतच सत्य सांठविलेलें आहे. ऋग्वेदांत ऋषींनीं जी स्तुति केलेली आहे त्यावरून धर्माची तत्त्वें निघतात. प्रत्यक्ष आज्ञा अशा ऋग्वेदांत नाहींत, कारण ऋग्वेद हा स्तुतिमय आहे. ऋग्वेदांत नीतीचीं तत्त्वें फारशीं नाहींत. ऋषींच्या ईश्वरभक्तीचा जिव्हाळा,

28

त्यांच्या अंतःकरणाची तळमळ आणि त्यांची
ईश्वराच्या ठायीं तल्लीनता या गोष्टी ऋग्वेदांत
आमुख्यानें पहावयास मिळतात. ऋग्वेदांत
अधर्मीयांचा नाश व्हावा, दुष्टांना शासन मिळावें,
ईश्वराचे भक्त पापापासुन मुक्त व्हावेत, अशा
साठीं प्रार्थना केलेल्या पुष्कळ आढळतात.
प्रेमानें किंवा गोडशब्दानें दुष्ट मनुष्य कधींही
वश होवूं शकत नाहीं, आणि म्हणुन त्याचा
नाशच होणें इष्ट आहे हीच भावना ऋग्वेद
कालीं होती. दुर्जनांना शिक्षा करणें याचेंच
नांव दण्ड. ईश्वरी सामर्थ्याची अत्यंत हृदयंगम
वर्णनें ऋग्वेदांत आहेत. वैदिकधर्ममार्ग
अगदीं साधा, सोपा, स्पष्ट व उन्नतिकारक
आहे.

मनानें आणि शरीरानें रोगरहित असुन
शक्तिमान असणें, आपले वंशज पराक्रमी
निपजावेत अशी आशा बाळगणें, स्वाव
लंबनाचा मार्ग पत्करणें। ईश्वरावर निष्ठा
ठेवणें, न्यायानें वागणें, युध्दप्रसंगीं
शौर्य दाखवुन विजय संपादन करणें, यथा
शक्ति परोपकार करणें, सत्पात्रीं दान करणें,
वगैरे वगैरे गोष्टींचे उपाय वेदामध्यें
सांगितले आहेत. वेदमार्गाच्या आचरणानें
ऐहिक आणि पारलौकिक अशीं दोन्हीं सुखें
प्राप्त होतात. ईश्वराची भक्ति करणें, न्यायानें
वागणें, पराक्रम करणें। स्वच्छता राखणें
सत्पात्रीं दान करणें व उद्योगी असणें हें

वैदिक धर्माचें खरें स्वरूप आहे. न्यायानें
वागुन ईश्वराला न विसरतां पराक्रमानें
ऐहिक उन्नति करून जगाच्या पुढें ~~रहा~~
रहावें हीच वेदाची शिकवणूक आहे. न्याय
हें धर्माचें बाह्य स्वरूप आहे व त्या मुळें
कीर्ति वाढते. ईश्वरभक्ति हें धर्माचें अंतः स्वरूप
आहे व त्यामुळें मोक्षाची फुलें पोसली जातात.
पराक्रम हा उद्योगस्वरूपी कर्ममार्ग आहे.
त्या कर्माचा हेतु गांजलेल्यांचें दुःख निवारण
करून परोपकार द्वारा परमार्थ साधणें हा
आहे. या धर्मांत न्यायाला अनुरूप अशी
अहिंसाही सांगितली आहेच. अत्याचार करणाऱ्या
अधर्मांना अहिंसा धर्माचा फायदा न मिळावा
या बद्दल मात्र पक्का बंदोबस्त या धर्मांत

केलेला आहे. आतां ज्ञान मार्गाच्या दृष्टीनें विचार करतां ज्ञानामध्यें श्रेष्ठ असें जें आत्मज्ञान त्याचाही ऊहापोह ऋग्वेदांत सांपडतो, आणि त्याला अनुसरूनच पुढें वेदांतांत म्हणजे उपनिषदांत त्या मार्गाचें परिपूर्ण विवेचन करण्याचें प्रयोजन पडलें. मानवी उच्च मनोवृत्तीची अशी एकही गोष्ट वेदानें वगळली नाही. आपण वेदाविषयीं जीं भलभलतीं विधानें करतां तीं केवळ वेदाचें ज्ञान नसल्यामुळेंच होत. ऋग्वेदामध्यें आचार, व्यवहार, यज्ञमार्ग, भक्ति, तत्त्वज्ञान या सर्वांचीं बीजें आहेत, पण कशाचाच अतिरेक त्यांत नाही, हेंच ऋग्वेदाचें वेदत्व आहे.

ऋक्संहिता हा ग्रंथ अगदीं शुध्द आणि निर्दोष आहे. वैदिक ऋचांचे कर्ते

अथवा मंत्रद्रष्टे हे उत्तमांत उत्तम कवि होते. याचा मासला म्हणुन आपण 'वृत्र' शब्द घेवूं. वृत्र म्हणजे वृत्रासुर (एक क्रूर दैत्य) हा एक अर्थ. वृत्र म्हणजे सर्व वस्तूंना झांकुन टाकणारा निबिड अंधःकार हा दुसरा अर्थ. वृत्र म्हणजे देवांचा सामान्य शत्रु हा तिसरा अर्थ. असे वृत्र या एकाच शब्दाचे तीन अर्थ त्या त्या प्रसंगाला अनुलक्षून घ्यावे लागतात. दुसरें उदाहरण 'धन' हा शब्द घेवूं. धन म्हणजे द्रव्य, हा एक अर्थ. धन म्हणजे युध्द, हा दुसरा अर्थ. धन म्हणजे स्वावलंबन, हा तिसरा अर्थ. धन म्हणजे सुप्रजा, हा चवथा अर्थ. अशा रीतीनें एकच शब्द निरनिराळ्या अर्थानें वापरलें हे

2e

कवीचें कौशल्य आहे, व भाषेचें सौंदर्य आहे.

ऋग्वेदांतील मंत्रानुष्ठाना संबंधानें ऋग्विधान ह्मणुन एक स्वतंत्र पुस्तक आहे. त्यांत कोणत्या मंत्रोचा काय उपयोग आहे अथवा त्यांची फलश्रुति काय आहे तें सांगितलेलें आहे. खुद्द गायत्री मंत्र हेंच ब्रह्मास्त्र. गायत्री मंत्राला सावित्री हें नांव पूर्वी होतें. सावित्री ह्मणजे सवितृ देवाचा मंत्र. हाच मंत्र पसंत करण्याचें कारण असें कीं बुद्धीला प्रेरणा करणाऱ्या प्रार्थना मंत्रांत हाच एक मंत्र सुरसुटीत आहे.

ऋग्वेदाच्या शाकल, बाश्कल, आश्वलायन, सांख्यायन, मांडुकेण वगैरे

नांवाच्या शाखा आहेत पण त्या पैकीं हल्लीं एक शाकल शाखाच कायती उपलब्ध आहे. ऋग्वेदाची विभागणी दोन प्रकारची आहे. अष्टक- अध्याय- वर्ग व ऋचा हा एक प्रकार, व मंडल- अनुवाक- सूक्त व ऋचा हा दुसरा प्रकार. अष्टकें आठ आहेत, व प्रत्येक अष्टकांत आठ आठ अध्याय आहेत; म्हणजे एकंदर ऋग्वेदाचे अध्याय ६४ आहेत. मंडलें १० आहेत व एकंदर सूक्तें १०२८ आहेत. मंत्रद्रष्ट्यामध्यें ऋषी आहेत व कांहीं ऋषींच्या स्त्रियाही आहेत.

व्यवहारांतील सर्व गोष्टींचा उल्लेख ऋग्वेदांत दिसतो. चांभारकाम, सुतारकाम,

लोहारकाम, नौकानयन, व्यापार, शेतकी, सोनारकाम, दरोडे, फसवेगिरी, व्यभिचार वगैरे सर्व गोष्टी ऋग्वेदांत सांपडतात. 32

ऋग्वेद कालचे आर्य उद्योगी, चपळ, आनंदी पण भांडखोर होते. हल्लींच्या हिंदु प्रमाणें ते आळसी, दुबळे, निर्जीव, व निवृत्तिपर नव्हते. संतति, संपत्ति, आणि वैभव मिळविण्यासाठीं ते प्रयत्न करीत. प्रयत्न म्हणजेच तप. तपाच्या योगानें असाध्य वस्तुही साध्य होतात. ऋग्वेद काळीं मूर्तिपूजा रूढ नव्हती. त्या काळीं एक वरुण देवताच कायती सर्वांत श्रेष्ठ मानली जात असे. इंद्र ही आर्यांची राष्ट्रीय देवता

होती. कारण हें दैवत युद्धप्रिय होतें.
इंद्र वृत्रांच्या युद्ध कलेंत निसर्गांतल्या अजस्त्र
व अचाट व्यापारांचें वर्णन ग्रथित केलेलें
आहे. अग्नि ही गृहस्थांची गृहदेवता आहे.
अग्नि, वायु व सूर्य हे आराध्य देव मानले
जात असत, इतकेंच नाहीं तर या तिघां
पासूनच तीन वेद उत्पन्न झाले असें
ब्राह्मण ग्रंथांत सांगितलें आहे. उषा ही ही
एक त्या काळची प्रमुख देवता होती.

या वेदांचें स्पष्टीकरण करणारे जे ग्रंथ
आहेत त्यांना ब्राह्मण ग्रंथ हें नांव आहे. ऋग्वेदाचें
ऐतरेय व कौषितकी (शांख्यायन) असे दोन
ब्राह्मण ग्रंथ आहेत. ऐतरेय ब्राह्मणांतच

ऐतरेय नांवाचेंच आरण्यक आहे, व त्या
ऐतरेय आरण्यकांतच ऐतरेय उपनिषद
आहे. कौषितकी ब्राह्मणाच्या शेवटीं
कौषितकी आरण्यक असुन त्याचाच एक
भाग कौषितकी उपनिषद नांवाचा आहे.

38

ऐतरेय ब्राह्मणांत आठ पंचिका व प्रत्येक
पंचिकेंत पांच अध्याय असे एकंदर ४०
अध्याय आहेत. ह्यांत मुख्यत्वें करून
सोमयाग (अग्निष्टोम), अग्निहोत्र, व
राजसूय यांचें वर्णन आलेलें आहे.
कौषितकी किंवा शांखायन ब्राह्मणांत
तीस अध्याय आहेत. यांत अग्न्याधान,
अग्निहोत्र, दर्शपूर्णमासाच्या इष्टी,

ऋतुयाग वगैरेंची माहिती व सोमयागाची
माहिती दिलेली आहे. पवित्र यज्ञवह्नि
पुरातन पध्दतीनेंच म्हणजे अरणी व
मंथ्यानेंच पेटविला पाहिजे. अग्नि                34
उत्पन्न करण्याच्या क्रियेची ऋग्वेदांत
प्रत्यक्ष जननक्रियेशींच तुलना करून
अग्निबालकाची
खालच्या लहान फळीला
माता व घर्षण काष्ठाला त्याचा पिता
असें मानलें आहे.

ऋग्वेदांतील सर्व गोष्टींची एक
यादी कात्यायनांनीं तयार केली आहे.
तिला 'सर्वानुक्रमणी' हें नांव आहे.
बृहद्देवता व ऋग्विधान हे ग्रंथ

शौनकानें तयार केलेले आहेत.
बृहद्देवतेंत देवतांची यादी आहे, व
ऋग्विधानांत मंत्रांचे परिणाम दिलेले
आहेत.

36

ऋग्वेदास दैवत मानून त्याचें
स्वरूप दिलेलें आहे. त्याचा वर्ण पिंवळा
आहे. त्याचें मुख उंदरा सारखें आहे.
हा वैखरी वाणीचा अधिपति आहे.
या वेदाचें महावाक्य 'प्रज्ञानं ब्रह्म'
हें आहे. याची जात वैश्य आहे. आयुर्वेद
हा याचा उपवेद आहे. याची देवता सोम
आहे. याचा छंद गायत्री आहे. याचें
गोत्र आत्रि आहे, व याचा ऋषि मधुच्छंद
आहे.

प्रज्ञानं ब्रह्म :- (यांचें विवेचन) :-

ज्या सद्ब्रह्माच्या योगानें पंचविषय म्हणजे शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध, हे प्रकाशित होतात; वागादि सर्व कर्मेंद्रियें ज्याच्या सत्तेमुळें प्रवृत्त होतात, व ज्याच्या योगानें इष्टानिष्ट सर्व पदार्थांचें ज्ञान होतें, त्याच चेतन अधिष्ठानाला ' प्रज्ञान ' म्हणतात.

देव, मनुष्य, पश्वादि सर्व प्राणिमात्रांत, आकाशादि सर्व भूतांत, ब्रह्मदेवापासून स्तंबापर्यंत (जडपदार्थापर्यंत) सर्वचराचरांत ज्या अर्थी ब्रह्म उपादान रूपानें (कारणरूपानें)

36

व अंतःसाक्षित्व रूपानें स्थित आहे
(या अर्थीं माझ्या मध्यें असलेलें 'अज्ञान'
पण साक्षात् ब्रह्मच आहे. अज्ञान स्वरूप
ब्रह्म माझ्यांत दिसत आहे. अर्थात्
व्याप्य-व्यापक अभिन्न चेतन स्वरूप
सर्वत्र एकच आहे.

—o—

38

### ३ कृष्णयजुर्वेद.

यजुर्वेद संहिता ह्मणजे अध्वर्यु ऋत्विजांचें कर्मदर्शक पुस्तक होय. या वेदाच्या १०१ शाखा ओहत असें व्याकरणकार पतञ्जली ह्मणतो. यजुर्वेदाच्याच इतक्या शाखा कां असाव्यात याचें कारण हेंच कीं निर निराळ्या प्रकारची यजन कृत्यें करीत असतां अध्वर्यूंना स्वतः प्रार्थना ह्मणाव्या लागत असत. या प्रार्थने संबंधानें निर निराळीं मतें व पंथ पडत गेले व त्यामुळें प्रार्थनांच्याहि निरनिराळ्या पोथ्या निघाल्या. विधी किंवा उपासना यांत अगदीं थोडाही फरक पडला तरी तेवढ्यानें एक नवीन वैदिक

पुष्कळ आला आहे. अगोदर संहिता वर्णा-
वयाच्या आणि मग ब्राह्मणें वर्णावयाची
ही जी सर्वसामान्य पद्धत ती बरीचशी
सुटलेली दिसते. याचा अर्थ इतकाच कीं
या कृष्ण यजुर्वेदांत संहिता आणि ब्राह्मण
एकत्र आहेत. तैत्तिरीय संहितेंतच तैत्तिरीय
ब्राह्मण आहे व आरण्यकही त्यांतच आहे.
या वेदांत ~~[illegible]~~ (१) अग्न्याधानविधि
~~[illegible]~~ (अग्निहोत्राचा स्वीकार करतेवेळीं
शमीच्या वृक्षांत वाढलेल्या पिंपळाच्या
झाडाच्या "अरणी" करून त्यांच्या घर्षणानें
उत्पन्न केलेला अग्नि तीन किंवा पांच ठिकाणीं
स्थापन करावयाचा विधि) ~~[illegible]~~. (२) पुनराधान
विधि (कांहीं कारणानें अग्निहोत्राची परंपरा

तुरली असेल तर पुनः ती जोडण्याचा विधि)
(३) अग्निहोत्रहोम (सकाळ संध्याकाळ तिन्ही
अग्नींच्या ठिकाणीं तुपाचा, दुधाचा किंवा
दुसऱ्या हवनीय द्रव्याच्या दोन दोन आहुति
देण्याचा विधि.) या होमांत, सूर्य व प्रजापति
यांना उद्देशून सकाळीं, अग्नि व प्रजापति
यांना उद्देशून संध्याकाळीं, आहुति देणें हा
एक मुख्य विधि अग्निहोत्राला आवश्यक
आहे. शिवाय ~~अग्नीजवळ~~ अग्निजवळ
उभें राहून प्रार्थना मंत्रही म्हणावे लागतात.
या उभें राहून प्रार्थना म्हणण्याच्या कर्माला
'उपस्थान', अशी संज्ञा आहे. (४)
दर्शपूर्णमास (अमावास्या व पौर्णिमा या दोन

पर्व दिवशीं संकल्प करून दुसऱ्या दिवशीं
जी इष्टि करावी लागते तिला अनुक्रमें ७
दर्शेष्टि व पौर्णमासेष्टि म्हणतात.
अमावास्येच्या इष्टींत अग्नि व इंद्राग्नि
यांनां आणि पौर्णिमेच्या इष्टींत अग्नि
व अग्निष्टोम या देवांनां हविर्भाग
द्यावयाचा असतो.) (५) पिंड पितृयज्ञ.
(पितरांना उद्देशून भाताचे पिंड दर्भांवर समर्पण
करण्याचा विधि.) आपल्याला पराक्रमी
पुत्र व्हावेत या साठीं हा करावयाचा असतो.
(६) सान्नाय्य (दही व दूध या दोहोंच्या
मिश्रणाला ही संज्ञा आहे.). (७) साकंप्रस्थायी
यज्ञ - हा काम्य आहे. चार किंवा पांच

अ

पात्रांत दुध व दहीं सिध्द करून यजन करावें लागतें. (८) दाक्षायण यज्ञ (प्रत्येक महिन्यांत हे यज्ञ चारदां करावयाचे असतात. (९) काम्य इष्टींची विधानें व त्यांचें होत्र. (यजमानाच्या ज्या प्रकारच्या कामना त्या प्रकारच्या इष्टि करावयाच्या असतात. (१०) 'आभिचारक' व 'स्वतंत्र' इष्टींचे होत्र. ('आभिचार' म्हणजे आपल्याशीं वैर करणाऱ्या शत्रूंचें नुकसान करणें व 'स्वतंत्र' म्हणजे अभ्युदयासाठीं करावयाच्या ज्या इष्टि त्या.) (११) चातुर्मास्य होत्र (अनेक इष्टींच्या समुच्चयानें होणारा असा हा एक

याग आहे. या यागाचे वैश्वदेव,
वरुणप्रघास, साकमेध व शुनासीरीय
असे चार भाग आहेत. चातुर्मास्यहोत्रमध्यें
हविर्भेदा प्रमाणें ऐष्टिक, पाशुक व सौमिक
असे तीन प्रकार आहेत. एकाच दिवसांत
चारी पर्वें समुच्चयानें करण्याचा एक चौथा
प्रकारहि आहे.) (१२) दर्शपूर्णमासेष्टींचें होत्र.
(दर पंधरवड्यास म्हणजे पौर्णिमा व अमावास्या
या दोन पर्वदिवसांच्या यागामध्यें येणारे
होत्याचे मंत्र यांत आहेत.) (१३) नित्य व
काम्य पशुयाग. (इंद्राग्नी, सूर्य अथवा
प्रजापति या देवतेला उद्देशून एक पशुयाग
करावयाचा असतो. हा एका मागून एक करतां येतो.

हा नित्य याग होय. भिन्न भिन्न कामनांचे भिन्न भिन्न पशुयाग आहेत.) (१४) नित्य व काम्य पशुयागाचें होत्र. (कोणत्या देवतेसाठीं कोणत्या 'याज्यापुरोनुवाक्या' म्हणावयाच्या त्यांचीं स्थळें यांत आहेत.)

(१५) अग्निष्टोम. (सोमयागामध्यें हा याग प्रथम करावा लागतो. सात सोमसंस्थांपैकीं 'अग्निष्टोम' नामक सोमयाग ही पहिली संस्था होय. अग्निष्टोमामध्यें सोमरसानें आहुति देण्याचा विधि १२ वेळां येतो.)

(१६) समिष्टयजु. (तुपाच्या आहुतीच्या मंत्राच्या अनुरोधानें केलेल्या आहुति प्रक्षेपास हें नांव आहे.) (१७) अवभृथ (सर्व

प्रकारच्या यज्ञाच्या शेवटीं नदी वगैरे जलप्रवाहावर जाऊन तेथें वरुण देवतेला उद्देशून एक लहानशी इष्टि करावयाची असते, व नंतर सर्वांनीं सामुदायिक स्नानविधि करावयाचा असतो. या स्नान विधीला 'अवभृथ' ही संज्ञा आहे.)

(१८) प्रवर्ग्य (उतरंडीच्या आकाराचे व टीचभर उंच असे एक तिमजली मातीचें पात्र तयार करतात, व त्यांत तूप ओतून त्याच्या भोंवतालीं अग्नीची खूप आंच देऊन त्याला कढवतात. नंतर त्या कढलेल्या तुपांत गाईचें व शेळीचें दूध ओततात. या मिश्रणास 'धर्म' ही संज्ञा आहे.

यांचें हवन करतेवेळीं मंडपाभोंवतीं पडदे लावून बंद करतात, व गुप्त रीतीनें हवन होतें.) (१९) अतिरात्र. (हा याग एक दिवस व एकरात्र उलटून गेल्यावर पुरा होतो. यांत सरस्वतीदेवतेसाठीं पशुयाग करावयाचा असतो.) (२०) अप्तोर्याम (हा सोमयागा सारखाच याग आहे.) (२१) वाजपेय (या नांवाचा सोमयाग 'संस्था', व 'स्वतंत्र', असा उभयरूप आहे. यांत २२ पशूंचें हनन केलें जातें. सतरा या संख्येचा यांत विशेष संबंध आहे. एक खांब रोवून त्यावर एक फिरतें चाक बसवितात, व त्यावर 'ब्रह्मा' नामक

ऋत्विजाला बसवितात. १७ घोड्यांना
जुंपून त्यांची शर्यत खेळली जाते.
वाजपेय याग करणाऱ्या पुरुषाला सार्व
भौम राजाप्रमाणें श्वेतछत्र धारण कर
ण्याचा अधिकार असतो. यजमानांस -
ऋत्विजांकडुन हुतशेषतुपानें विधिपूर्वक
अभिषेक करण्यांत येतो.) (22) दशपेय
(या यज्ञांत एकेका लांकडी पाळ्यानें दहा
दहा ब्राह्मण सोमरस पीत असल्यानें या
यज्ञाला 'दशपेय' ही संज्ञा पडली आहे.)
(23) राजसूय ( हा सोमयाग फक्त अभिषिक्त
राजालाच करतां येतो. या यागांत -
वाघाच्या कातड्यावर बसवून अभिषेक करावयाचा

असतो. यांत रथांची धांवाधांव, दुन्दुभी वादन वगैरे गोष्टीही असतात.) (२४) ५०

अश्वमेध (हा सोमयाग सार्वभौम चक्रवर्ति अशा राजपुरुषानें करावयाचा असतो. श्यामकर्ण जातीचा एक घोडा चारी दिशांना हिंडवावयाचा असतो, व जो राजा त्याला धरील त्याला जिंकून घोडा सोडवावयाचा असतो. एक वर्षांत घोडा सर्वत्र फिरवून आणला व विजयी ठरला म्हणजे तो घोडा मारून त्याच्या शरीराच्या निरनिराळ्या - अवयवांचा याग या अश्वमेध यज्ञांत करावयाचा असतो. प्रत्येक ऋत्विजाबरोबर १०० माणसें या प्रमाणें चार ऋत्विजांनीं

४०० माणसांसह या घोड्याला मंगलस्नान घालतात. या घोड्यावर एक कुत्रें पाण्यांत सोडण्यांत येतें व त्या कुत्र्याचा मुसळांनीं वध करण्यांत येतो. अश्वमेध यज्ञांत पशूंना बांधण्याचे २० खांब असतात. एका एका खांबाला ०१८ पशु बांधतात असे १८० पशु मारले जातात. यजमानपत्नी व मृतघोडा या उभयतांचा मैथुनप्रसंग हा या यज्ञांत विहित आहे.) (२५)

महाव्रत (कांहीं सोमयागांत 'महाव्रत' नांवाचा एक विधि करण्यांत येतो. यांत अनेक चमत्कारीक गोष्टी पहावयास मिळतात. नाच, गाणें हें यांत विशेष असतें. कला कुशलतेची कामेंही यांत पुष्कळ असतात.)

५१

(२६) सौत्रामणि ( सुराद्रव्य प्रधान असा हा एक स्वतंत्र याग आहे.) (२७) पुरुषमेध (यांत प्रत्यक्ष पुरुषाचें हनन होत नसुन त्यांना पशूंच्या ऐवजी उभे करतात, व नंतर त्यांना सोडुन तुपाच्या आहुतींनीं यजन करतात.) (२८) आग्निष्टुत (आग्निष्टोमा प्रमाणेंच पण थोडा फेरफार युक्त असा हा याग आहे.) (२९) इंद्रस्तुत ( यांत इंद्राची स्तुति मुख्य आहे.) हा आग्निष्टुता सारखाच आहे. (३०) पंचशारदीय (पांच वर्षें शारद ऋतूंत लागोपाठ हा याग करावयाचा असतो. यांत मुख्य देवता मरुत आहे.)
(३१) विघन ( हा जवळ जवळ आग्निष्टोमा

52

सारस्वाच आहे.) (32) विध्यपराध (हा एक प्रायश्चित्तात्मक याग आहे.) (33) चयन (हा एक सोमयागांतील विधि विशेष आहे.) 200/200 विटांचे एकावर एक असे पांच थर रचून केलेल्या ओट्याला 'चिति' अथवा 'चयन' हें नांव आहे. (34) काठकचयन (कठ महर्षींनी हा प्रचारांत आणला म्हणून त्याला हें नांव मिळालें आहे.) हे पांच प्रकारचे आहेत. यांत विटांच्या ऐवजीं चुन खडीचे खडे मांडतात. (35) लोष्ठचिति (ज्या आग्निहोत्र्यानें जिवंत असतांना चयन मांडलेला असतो त्या आग्निहोत्र्याच्या अस्थींवर कच्च्या मातीच्या ढेकळांचा चयन मांडावयाचा असतो.) (36) मृताचा प्रेतविधि (आग्निहोत्री

मृत झाल्यास त्याचा जो प्रेतसंस्कार होतो
तो श्रौतविषयक पद्धतीनें होत असुन
त्याचें नांव ' ब्रह्ममेध ' असें आहे; आणि
अग्निहोत्र स्वीकारल्या वांचुन मृत ~~होण्याच्या~~ होणाऱ्याचा
प्रेतविधी स्मार्त पध्दतीने व्हावयाचा असुन
त्या पद्धतीचें नांव ' पितृमेध ' असें आहे.)

54

(३७) सव ( त्या यज्ञांत यजमानास विशिष्ट
रीतीनें अभिषेक करण्यांत येतो त्या यज्ञांना
' सव ' संज्ञा आहे). हे याग ब्राह्मणसव,
वैश्यसव, पृथिसव, सोमसव, ओदनसव,
गोसव, वगैरे प्रकारचे असतात.)
(३८) सोमयाग ( हे तीन प्रकारचे आहेत.
१ हीन, २ अहीन, ३ सत्रात्मक व शिवाय
विशिष्ट रूपाचेही आहेत.).

(३९) सत्रं ( फार दिवस समुच्चयानें चालणारे सोमयाग. यांत सर्वांनी मिळुन एक गृहपति म्हणुन ठरविलेला असतो. त्याच्या नेतृत्वाखालीं सर्व अनुष्ठान कित्येक दिवस चालु असतें. संवत्सरसत्र, गवामयन, स्वर्गसत्र, नक्षत्रसत्र, वगैरे नांवाचीं सत्रें आहेत.)

या शिवाय या कृष्ण यजुर्वेदांत श्रौतयज्ञाशीं संबद्ध होणारीं व स्वतंत्र अशी निरनिराळीं कर्में व विधि आहेत. उदा तंभयाग, नैर्ऋतयाग, सात्यदूत, अयुज होम, तसेंच स्मार्तविषयक निरनिराळे विधि व याग हेही त्यांतच आहेत. उपासना व तत्त्वज्ञान विषयक माहिती देखिल भरपूर आहे.

अशा अशा प्रकारच्या सामाजिक, धार्मिक
व राष्ट्रीय विधींनीं हा ग्रंथ भरपूर
भरलेला आहे.

५६

या वेदाची सात कांडें व ४३
प्रपाठकें आहेत. यजुर्वेद हा यज्ञप्रधान
असल्यामुळें वेदत्रयीमध्यें तोच 'भित्तिस्थानीय'
मानला जातो, व त्या दृष्टीनें ऋग्वेद व
सामवेद हे 'चित्रस्थानीय' मानले जातात. यज्ञ
कर्माच्या दृष्टीनें मंत्र व ब्राह्मण या दोहोंनीं
युक्त असा जो हा यजुर्वेद त्यालाच प्राधान्य
दिलें जातें. यांतील मंत्रांचे तीन प्रकार आहेत.
१ आध्वर्यव २ याजमान व ३ हौत्र. या तिन्ही
मध्यें आध्वर्यव मंत्र आधारभूत असल्यामुळें
प्रथम तेच दिले आहेत, व त्यामागुन ~~याजमान~~
याजमान

संबंधी व होत्र संबंधी मंत्र दिले आहेत.
पहिल्या तेरा अनुवाकांत 'इषेत्वा' इत्यादि
मंत्राने आरंभ होणारे मंत्र 'आध्वर्यव' होत.

यज्ञा संबंधी विचार करतां सोमयाग
हा फार महत्वाचा आहे. यांत १८ ऋत्विज
असतात. त्यांची नांवें :- १ अध्वर्यु, २ ब्रह्मा,
३ होता, ४ उद्गाता, ५ प्रतिप्रस्थाता, ६ ब्राह्मणा-
-च्छंसी, ७ प्रशास्ता (मैत्रावरुण), ८ प्रस्तोता,
९ नेष्टा, १० आग्नीध्र, ११ अच्छावाक,
१२ प्रतिहर्ता, १३ उन्नेता, १५ ग्रावस्तुत,
१६ सुब्रह्मण्य, व १८ सदस्य. या शिवाय
इतर कामगिरी साठीं उपऋत्विज असतात ते:-
१ चमसाध्वर्यु, २ उपगाते, ३ ध्रुवगोप,

४ पशुपाल, ५ श्रेल्य, ६ दोग्धा, ७ शमिता, ८ दुविकृत वगैरे.

५८

यज्ञाच्या अंगभूत पुढील कर्में करावीं लागतात. १ अग्निमंथन, २ कृषि, ३ खारकाचें काम, ४ ह्रुआमंत करणें, ५ पिण्याची दारू तयार करणें, ६ स्वयंपाक करणें (चरू = भात. पुरोडाश = पीठ कालवणें. धाना = भाजलेले जव. परिवाप = भाताच्या लाह्या. आमिक्षा = दूध दह्याचा चोथा. वाजिन = चोथ्याचें पाणी. पोहे वगैरे. भाजीपाले, कोशिंबिरी व इतर पक्वान्नें हे प्रकार वेदांत आढळत नाहींत.) ७ सोनार काम, ८ सुतार काम, ९ कुंभारकाम, १० चांभारकाम, ११ कोष्टीकाम, १२ लोहारकाम, १३ शिवणकाम,

अहं ब्रह्मास्मि :- (याचें विवेचन) :-

देश, काल, वस्तु परिच्छेद रहित (नित्य, व्यापक, अद्वितीय) परमात्मा ज्ञानसंपादनयोग्य अशा मनुष्याच्या शरीरांत (प्राणिमात्रांत) अंत: साक्षी स्वरूपानें 'अहंकारा'च्या योगानें प्रतीतीस येतो. हा स्वयंपरिपूर्ण परमात्मा 'ब्रह्म' पदानें कल्पित आहे. वाक्यान्तर्गत 'अस्मि' म्हणजे 'आहे' हें पद समानाधिकरण बोधक, आणि जीव-ब्रह्माचा अभेद (आत्मैक्य - स्वयंसिद्ध) प्रतिपादक असल्यामुळें 'अहं' (परमात्मा) ब्रह्म आहे.

# ४ शुक्ल यजुर्वेद.

शुक्ल यजुर्वेद संहितेस वाजसनेय अथवा
वाजसनेयि संहिता म्हणतात. याज्ञवल्क्य
ऋषीनीं ही वाजी म्हणजे सूर्य याच्या
पासुन घेतली म्हणुन हिला वाजसनेयि
नांव मिळालें. वाजसनेयि संहितेचें
४० अध्याय आहेत. पहिल्या २५
अध्यायांत अत्यंत महत्वाच्या महायज्ञांचे
मंत्र दिलेले आहेत. पहिल्या दोन
अध्यायांत दर्शपूर्ण मासांचे मंत्र दिलेले
आहेत, व त्या खेरीज पिंड पितृयज्ञाचेही
मंत्र आहेत. तिसऱ्या अध्यायांत नित्य अग्निकर्म,

अग्निआतिथ्य, आणि प्रातः सायंकालीन
अग्निहोत्रांतील हवन, तसेंच चारचार
महिन्यांनीं करावयाचे चातुर्मास्य यज्ञ
याविषयीं माहिती आहे. ४ ते ८ अध्या
यांत सोमयज्ञ व सामान्यतः त्यांतील
पशुयज्ञ या विषयीं मंत्र आहेत.
एक दिवसाच्या यज्ञापैकीच 'वाजपेय'
हा यज्ञ आहे. हा यज्ञ योद्धे व राजे
रथांच्या शर्यतीच्या वेळीं करीत असत,
व त्या वेळीं सोम आणि सुरा सेवन
करीत असत. अशा रीतीनें सुरेचा
उपयोग इतरत्र करण्याबद्दल ब्राह्मणधर्म
शास्त्रानें मनाई केलेली आहे. फक्त राजां

करितांच 'राजसूय' यज्ञ असे. ९ ते १०
अध्यायांत सोमयाग, राजसूय व वाजपेय
यज्ञांतील मंत्र आहेत. ११ ते १८ अध्यायांत आनि
चयन विधि व त्याचे मंत्र आहेत.
१९ ते 21 अध्यायांत सौत्रामणि विधि
सांगितला आहे. सौत्रामणि यज्ञांतहि
सोमाच्या ऐवजीं सुराच घेतात, आणि
आश्विनी, सरस्वती, व इंद्र यांना ती
समर्पण करितात. 22 ते २५ अध्यायांत
अश्वमेध यज्ञाचे मंत्र आहेत. पृथ्वीपति,
बलाढ्य, जेता, किंवा मोठा पराक्रमी
राजा यांनींच अश्वमेध यज्ञ करावयाचा
आहे. यांतच राष्ट्रीय प्रार्थना आहे.

पुढच्या २६ ते ३५ अध्यायांना 'खिल'
म्हणजे पुरवण्या अशा संज्ञा आहेत.
त्यांतील ३२ ते ३४ अध्यायांतील मंत्रांचा
उपयोग 'सर्वमेध' यज्ञांत करतात.
'सर्वमेध' हा सर्वश्रेष्ठ यज्ञ आहे, त्यांत
यजमान यज्ञदक्षिणा म्हणुन आपले सर्वस्व
ऋत्विजांना दान करतो; आणि स्वतः वानप्रस्थ
बनून आरण्यांत जातो, व तेथें आपल्या
आयुष्याचे उरलेले दिवस घालवतो.
३५ साव्या अध्यायांत मृत्योत्तर क्रिये
संबंधानें ऋग्वेदांतीलच कांही मंत्र
दिलेले आहेत. ३६ ते ३९ अध्यायांत

प्रवर्ग्य दिलेले आहेत. शेवटचा ४० सावा अध्याय हें मोठें महत्वाचें 'ईशोपनिषद्' आहे.

शतपथ ब्राह्मण हा शुक्ल यजुर्वेदाचा प्रमुख ब्राह्मण ग्रंथ आहे. याचे १०० अध्याय आहेत, म्हणुन याला शतपथ ब्राह्मण हें नांव आहे. या ब्राह्मण मंत्राच्याही दोन शाखा आहेत. एक 'काण्व' व दुसरी 'माध्यंदिन'. माध्यंदिन शाखीय ब्राह्मणांत १०० अध्यायांची १४ कांडें आहेत. बृहदारण्यकोपनिषद् हें या वेदाचेंच आहे.

ब्राह्मण ग्रंथांतुन ब्राह्मणांची चार

कर्तव्यें सांगितलीं आहेत. १ ब्राह्मण्य परंपरा चालविणें. २ शील राखणें. ३ ज्ञान मिळवून कीर्ति संपादन करणें, व ४ लोकांना पक्व दशेला आणणें (यज्ञ करून लोकांना परलोकास पात्र करून त्यांची ऐहिक व पारमार्थिक उन्नति करविणें.) अशी परोपकारक कार्यें ब्राह्मण करीत असल्यामुळेंच त्यांना समाजांत अग्रस्थान व महत्त्व हीं मिळालेलीं होतीं.

ब्राह्मण ग्रंथांतील विषयांचे दोन मुख्य वर्ग करण्यांत येतात. एक विधी व दुसरा अर्थवाद. विधी म्हणजे 'नियम', 'निर्देश' व अर्थवाद म्हणजे अर्थसंबंधीं

विवेचन. आरंभीं ब्राह्मणांत एक एक विधी कसा करावयाचा या विषयीं नियम घालुन दिलेले आहेत. नंतर यज्ञ कर्म व मंत्र यांतील हेतु, अर्थ, यांचे विवेचन व निरूपण त्यांपुढें जोडलें आहे

उपवासां विषयीं ब्राह्मणग्रंथांत

असें सांगितलें आहे कीं काहींही भक्षण न करणें हेंच व्रत आहे. देवांना मनुष्याचें मन कळतें. जो कोणी हें व्रत आचरतो तो दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपल्यास आहुति देईल हें देवांस माहीत असतें, म्हणुन सर्व देव त्याच्या घरीं जातात व त्याच्याच घरींच

राहतात (उपवसन्ति) व त्यावरून या दिवसाला 'उपवसथ' म्हणजे उपवास असें म्हणतात.

शतपथ ब्राह्मणांत पुरूरवा व उर्वशी यांची कथा, शुनःशेपाचें आख्यान, ही असून शिवाय प्रसंगोपात्त अनेक छोटीं आख्यानें आहेत. चारी वर्णांचा मूळ इतिहास ब्राह्मण ग्रंथांत वारंवार आढळतो.

जगाच्या उत्पत्ती विषयीं अनेक कथानकें आहेत. त्यांतील एक असें आहे कीं प्रथम येथें फक्त 'असत्'चें आस्तित्व होतें. असत् म्हणजे प्राण. या प्राणापासून

पहिले सात पुरुष निर्माण झाले. कसे
झाले ते माहीत नाही. त्यांचे एकीकरण
होऊन ~~करून~~ एक पुरुष (प्रजापति) निर्माण झाला.
या प्रजापतीला प्रजा उत्पन्न करण्याची
इच्छा झाली. त्यानें देहदंड व तपश्चर्या हीं
आचरलीं, त्यामुळें ~~[illegible]~~ त्रयीविद्या म्हणजे
'ब्रह्म' निर्माण झालें. हें ब्रह्म म्हणजेच
सर्व सृष्टीचा पाया म्हणजे प्रतिष्ठा होय.
वेदाभ्यास झाल्यावरच हा पाया भक्कम
होतो, कारण वेद (ब्रह्म) हाच मूळ
पाया आहे. ह्या ब्रह्म प्रतिष्ठेवर उभे
राहून प्रजापतीनें तप केलें, व प्रथम

६०

जल निर्माण केले. नंतर वेदाच्या साह्यानें त्यानें एक अंडें तयार केलें. त्या पासून अग्नि झाला. (अग्रे जातत्वात् अग्नि:). त्या अंड्याची जी कवची होती तिची पृथ्वी झाली. पुढें पंचमहाभूतें झालीं. ब्रह्म शब्दाचा मूळ अर्थ स्तोत्र असा होता. त्याला पुढें पवित्र किंवा मंत्र असा अर्थ आला. अशा ज्ञान किंवा वेद रीतीनें या पुढचे [illegible] 'आरण्यकं' नामक जे ग्रंथ व त्यांत उपनिषदें आहेत त्यांत ज्या गोष्टी पूर्ण विकासानें दिसतात त्याची सुरवात या ब्राह्मण ग्रंथांत केलेली आहे.

तत्त्व ज्ञानाचा उगम ब्राह्मण ग्रंथांतच
झाला आहे. तत्त्व ज्ञानाचे ग्रंथ म्हणजे ८९
आरण्यके व उपनिषदें होत. पुरातन
तत्त्व ज्ञानी केवळ ब्राह्मण वर्गातच होते
असें नाहीं. शतपथ ब्राह्मणाच्या ११ व्या
कांडांत विदेह देशाचा राजा जनक ह्यानें
आपल्या ज्ञानानें सर्व ब्राह्मणांची गाळण -
उडविल्याचें वारंवार वर्णन आहे. ब्राह्मणांनी
या जनक राजाचा पराभव करण्याचा पुष्कळ
प्रयत्न केला, पण राजा अजिंक्य ठरला.
वेद रचणारे ऋषी सर्वच ब्राह्मण होते
असें नाहीं. कवष मुनि हा ब्राह्मण नसुन
तो दासी पुत्र होता. अयस्थूण ऋषी

हाही ब्राह्मण नव्हता. सयुग्वा रैक्व व
सत्यकाम जाबाली हेही ब्राह्मण नव्हते. गार्गी, मैत्री
इत्यादि स्त्रियांनी देखील तत्त्वज्ञानांत
भर टाकली आहे. उपनिषदांत सर्वत्र
तत्त्वज्ञान प्रचुर विचार आहेत.

62

# ५ सामवेद.

सामवेदाची एकच संहिता उपलब्ध आहे.
तिचे दोन भाग आहेत. एक आर्चिक
अथवा साम (ऋचा) संग्रह, आणि दुसरा
'उत्तरार्चिक'. या दोन्ही भागांत ज्या
ऋचा आहेत त्या बहुतेक सर्व ऋग्वेदांत
आलेल्याच आहेत. एकंदर १८१० ऋचांपैकी
किंवा पुनरुक्ति गाळुन टाकल्या तर १५४९
ऋचांपैकीं ७५ ऋचा वगळुन बाकी सर्व
ऋग्वेदांत आहेत. या ऋचा गाण्याच्या
सुरावर म्हणण्याचाच प्रथमपासुन हेतु होता.
गाण्याचे राग शिकविणें हाच सामवेदाचा

हेतु आहे. सामवेदाच्या पाठशाळेंत उद्गाता होण्याकरितां ज्या विद्यार्थ्यांस शिक्षण देणें असेल त्याला प्रथम रागरागिण्या शिकाव्या लागतात. या रागरागिण्या आर्चिका वरून शिकत. आर्चिक तयार झाल्यानंतर मग शिकणाराला यज्ञाच्या वेळीं म्हणावयाची स्तोत्रें पाठ करतां येत असत, आणि त्या कामाला उत्तरार्चिकाचा उपयोग होई. साम याचा अर्थ स्वर किंवा छंद असा आहे. ऋचेतुन राग निघतो म्हणुन ऋचेला "योनि" अशी संज्ञा आहे. शब्द जसे उच्चारले जातात तसेच संहितेच्या दोन्ही भागांत दिलेले आहेत. गानांची अथवा पद्यांची पुस्तकें अलीकडली

आहेत. त्यांत सूर दिलेले असतात.
गातांना जसें ह्मणतात तसें त्याचे शब्द
ह्मणजे अक्षरें लांबवून, पुनरावृत्ति व अक्षेप
करून जशी शब्दांची रूपें होतात तशींच
रूपें पद्यांत लिहिलेली असतात. त्यांना
'स्तोभ' ह्मणतात.

अगदीं प्राचीन सूरलेखनपद्धति-
त, का, ण, इत्यादि अक्षरांच्या
साह्यानें केलेली आहे. पुष्कळ वेळां
सात आंकडे (१-२-३-४-५-६-७) योजि
तात. त्यांच्या समानार्थी अक्षरें पाश्चा
त्यांच्या पद्धतीमध्यें F. E. D. C. B. A. G
हीं आहेत, व आपल्या अर्वाचीन पद्धतींत

सा, री, ग, म, प, ध, नि ही आहेत.
सामवेद म्हणण्याची पध्दतहि दोन -
प्रकारची आहे. एक ग्रामगेयगान व दुसरी
अरण्यगेयगान. आर्चिक म्हणजे छंदांची
अथवा वृत्तांची पुस्तकें आणि उत्तरार्चिक
म्हणजे संगीताची पुस्तकें म्हटलें असतां
चालेल.

'सामविधान ब्राह्मण' या नांवाचें
सामवेदाचें एक ब्राह्मण आहे. या शिवाय पंच
विंश (ताण्डय), षड्विंश, आर्षेय, मंत्र,
दैवताध्यान, वंश, संहितोपनिषद्, जैमिनीय,
जैमिनीयोपनिषद्, असेही ब्राह्मण ग्रंथ
आहेत. छांदोग्योपनिषद् व तलवकार

आरण्यकें हीं याचीच आहेत. ——

—— पंचविंश किंवा तांडय ब्राह्मणांत पंचवीस अध्याय आहेत. षड्विंश ब्राह्मण हें पंचविंश ब्राह्मणाचें परिशिष्ट आहे. याच्या शेवटच्या भाग जो सहाव्या अध्यायास 'अद्भुत ब्राह्मण' म्हणतात. यांत शकुन, अपशकुन, अरिष्टें वगैरेंचे विवेचन आहे.

सामवेदाचा वर्ण काळा आहे. याचें श्वानमुख आहे. हा अजाकर्ण आहे. पश्यंती वाणीचा हा अधिपति आहे. याचा उपवेद गंधर्व आहे. याचें गोत्र भारद्वाज आहे. याचा ऋषि गौतम आहे. याची

देवता अग्नि आहे. याचा छंद जगती आहेत. याचें महावाक्य 'तत्त्वमसि' आहे.

तत्त्वमसि :- (याचें विवेचन) :-

सृष्टीच्या पूर्वी भेदत्रय (स्वगत, सजातीय, विजातीय) आणि नामरूपांनीं रहित जी विद्यमान अद्वितीय सद्वस्तु तेंच वर्तमान - सृष्टि उत्तर कालीं पण निर्विकार कारण ब्रह्म 'तत्' पदानें समजलें जातें.

श्रोत्याचे देहत्रय (स्थूल, सूक्ष्म व कारण), याच्या योगानें तत्साक्षीभूत 'चैतन्य' तें या वाक्यांत 'त्वं' पदानें निर्दिष्ट आहे. 'असि' पदाच्या योगानें दोघांच्या समाधिकरणतेनें शिष्याला 'ब्रह्मात्मैक्याचा' उपदेश आहे. म्हणुन मुमुक्षूंनीं अधिष्ठान रूप आत्म्याच्या अभिन्नतेचा अनुभव करावा.

—०—

८०

## ५ अथर्ववेद.

व्यवहारोपयोगी पुष्कळसा भाग व आभिचार म्हणजे जारण-मारण-उच्चाटण या विषयींची भरपुर माहिती अथर्व वेदांत आहे. प्राचीन काळीं अग्नि उपासकांना 'अथर्वन्' म्हणत असत. त्या लोकांवरून या वेदाला अथर्ववेद हें नांव प्राप्त झालें आहे. पारसी लोकांचा धर्मग्रंथ जो "अवेस्ता" नांवाचा आहे त्यांत वर्णन केलेले 'अथ्रवन्' लोक व हिंदूंचे 'अथर्वन्' लोक यांच्यांत पुष्कळ सारखेपणा आहे. या अग्निपूजकांना जादुटोणा वगैरेंची पुष्कळ माहिती होती. अग्नि

उपासकांचा एक वर्ग फार प्राचीन कालीं होता, त्या वर्गाला आंगिरस् ही संज्ञा होती व त्या वरून या अथर्व वेदाचें जुनें नांव 'अथर्वांगिरस' असें होतें. स्वतंत्र ब्राह्मण जातीचा उदय होण्या पूर्वी ज्या लोकांकडे भारतीय लोकांचें पौरोहित्य होतें त्यांना 'अथर्वण' हेंच नांव होतें. अथर्व वेदांत अथर्वन् मंत्र वर्ग व आंगिरस मंत्र वर्ग असे निरनिराळे वर्ग आहेत. अथर्वन् मंत्र-पवित्र व सुखकारक आहेत व आंगिरस मंत्र-पीडाकर आहेत. अथर्वन् मंत्रांमध्यें रोग निवारक विधि आहेत तर आंगिरस मंत्रांत शत्रू व दुष्ट यांना शाप देण्याचे मंत्र आहेत.

69

अथर्ववेद संहितेंत एकंदर ७३१
सूक्तें व सहा हजार ऋचा आहेत. या
वेदाची वीस कांडें आहेत. विसाव्या कांडांतली
बहुतेक सर्व सूक्तें ऋग्वेदांतूनच घेतलेली
आहेत. इतकेंच नाहीं तर या वेदाच्या इतर
कांडांतहि ऋग्वेदांतली सूक्तें बऱ्याच
ठिकाणीं दिसतात. या वेदाच्या पहिल्या अठरा
कांडांची रचना फारच पध्दतशीर व काळजी
पूर्वक केलेली आहे.

फार काळ पर्यंत भारतीय लोक या
अथर्ववेदाला पूज्य व पवित्र मानित नव्हते.
त्याला कारण या वेदांतील विषय होत.
या वेदाचा हेतु अनिष्ट शांति, इष्टपूर्ति,

व शत्रुपीडा हे आहेत. शाप आणि भूतें खेतें काढण्याचे मंत्र व उपचार या गोष्टी अपवित्र मानल्या असल्यामुळें ब्राह्मणांनीं या वेदाला आपल्या पासुन दूर ठेवण्याचा प्रयत्न केला. ब्राह्मणी धर्मशास्त्रां तुन 'चेटुक' हें पाप मानलें आहे. चेटुक करणाऱ्याला राजानें शिक्षा करावी असें ब्राह्मणी धर्म सांगतो. तीनही वेदांत पर्यायानें अशा प्रकारचे मंत्र आलेले आहेत, तरीपण याच वेदांत तशा गोष्टींचे प्राधान्य असल्यामुळेंच याला वेद त्रयींत दाखल केलेला नाहीं.

वेदत्रयी व अथर्ववेद यांच्यामध्यें फरक असा आहे कीं, वेदत्रयी म्हणजे श्रद्धेक,

यजु व साम या तीन वेदांचें मिळून स्वातंत्र्यप्रिय आर्यांचें स्वतंत्र व्यवहार करणारें एक वाङ्मय आहे, व अथर्व वेद म्हणजे गरीब, कपी कर्तृत्ववान्, परंतु त्यांचें आस्तित्व अव्याहत रहाणारें आहे व जे राजाश्रयानें अथवा लोकाश्रयानें उपजीविका करणारे आहेत त्यांचे व्यवहार चालविणाऱ्या पुरोहित वर्गाचे वाङ्मय होय. मुंडकोपनिषद हें या वेदाचें आरण्यक मानतात. या वेदांचा गोपथ - ब्राह्मण ग्रंथ स्वतंत्र आहे. या वेदाचा वर्ण सुनील आहे. हा कोल्ह्या सारखा आहे. याचें तेज दिव्य आहे. याचा उपवेद "स्थापत्य" आहे. याचें गोत्र वैखानस आहे. याचा ऋषि दध्यङ्ङाथर्वण आहे. याची देवता वरुण (आप) आहे

68

याचा छंद अनुष्टुप आहे. परावाणीचा हा ८५
आधीपति आहे. यांचें महावाक्य
'अयमात्मा ब्रह्म' हें आहे.

'अयमात्मा ब्रह्म' :- (याचें विवेचन) :- ८८

प्रत्यक्ष स्वरूप दर्शक 'अयम्' पदाच्या योगानें स्वयंप्रकाश आत्म्याचें प्रत्यक्ष ग्रहण केलें जातें, व अहंकारापासून देहापर्यंत (अंतःसाक्षित्व) च्या लक्षणा वरून प्रत्यगात्मस्वरूप कथन केलें जातें.

आकाशादि पंचभूतात्मक सर्व जगताचें अधिष्ठान सत्यस्वरूप 'ब्रह्म' शब्दाच्या योगानें असतें जातें तेंच स्वयंप्रकाश 'ब्रह्म' आत्म स्वरूप आहे.

—o—

## ७ वेदांगें.



विद्या दोन प्रकारच्या आहेत. एक परा व दुसरी अपरा. पराविद्येनें अक्षर ब्रह्माच्या ज्ञानाची प्राप्ति होते. अपरा विद्येंत वैदिक दश ग्रंथ ह्मणजे १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, ४ अथर्ववेद, ५ शिक्षा, ६ कल्प, ७ व्याकरण, ८ निरुक्त, ९ छंद व १० ज्योतिष यांचा समावेश होतो. शिक्षा, कल्प वगैरे सहांना वेदाची षडंगें किंवा वेदांचे उपग्रंथ ह्मणतात. षडंगांसहित वेदाध्ययन करणें त्यालाच सांगवेदाध्ययन ह्मणतात. वेदांगांचा प्रारंभ ब्राह्मणांत व

[के] आरण्यकांत झालेला आहे. वेदाध्ययन
करण्यास सुलभ जावें ह्मणुन गद्यात्मक
सूत्रें रचण्यांत आलीं. लहान लहान सूत्रांचे
ग्रंथ बनविण्यांत आले. त्यांना 'सूत्र ग्रंथ'
ही संज्ञा मिळाली. हे ग्रंथ व्यावहारिक
दृष्टीनें लिहिलेले आहेत. विद्यार्थ्यांना पाठ
करण्यास सुलभ जावें ह्मणुन सूत्रग्रंथांत
कोणतें तरी शास्त्र पद्धतशीर रीतीनें व
थोडक्यांत सूत्ररूपानें निवेदन केलेलें [आहे].
असतें. या सूत्रग्रंथांवरील टीका वंशपरंपरेनें
संभाळून ठेवलेल्या आहेत. त्याजर नसत्या
तर सूत्रग्रंथ दुर्बोध झाले असते. शब्द
कमी लागावेत ह्मणुन संक्षिप्त वाक्यरचना

योजलेली असते, आणि त्यामुळें टीका खेरीज त्यांचा अर्थ लावतां येत नाही. शिक्षा, कल्प वगैरे जीं सहा वेदांगें आहेत त्यांच्या विषयीं आतां आपण विचार करूं.

## शिक्षा.

शिक्षा याचा अर्थ 'शिकणें', 'पठणकरणें' असा आहे. स्पष्ट उच्चार व बरोबर आघात यां सह पठण झालें पाहिजे. शिक्षा ग्रंथाचा संहितांशीं निकट संबंध असतो. तैत्तिरीय उपनिषदांत शिक्षेचे सहा भाग सांगितले आहेत ते:-(१) शब्द व त्या वरील (२) आघात, (३) पदक्रमाण किंवा शब्दावयव व त्यावरील (४) आघात. (५) शब्दमाधुर्य व (६) शब्दसंधि.

शिक्षा ग्रंथांत पदपाठ दिलेले आहेत.
पदपाठ हें वैयाकरणी लो कोचें काम आहे.
शाकल्य नांवाच्या आचार्यांनी ऋग्वेदाचा
पदपाठ लिहिला. शिक्षेचें काम म्हणजे
संहितापाठ व पदपाठ लिहिणें हें होय.
या विषयीं जुन्यांत जुना ग्रंथ म्हणजे –
'प्रातिशाख्यें' होत. ह्यांत पदपाठावरून
संहितापाठ कसे तयार करावयाचे त्या संबंधी
नियम आहेत, व संहिता म्हणण्याच्या पद्धतीचें
पूर्ण विवेचन त्यांत केलेलें आहे. प्राति
शाख्यें चार आहेत. १ ऋग्वेद प्रातिशाख्य,
२ तैत्तिरीय (कृष्ण यजुर्वेद) प्रातिशाख्य, ३
वाजसनेयी (शुक्ल यजुर्वेद) प्रातिशाख्य व ४
अथर्ववेद प्रातिशाख्य. या शिक्षाग्रंथां
पासूनच व्याकरणाच्या अध्ययनाला आरंभ झाला.

# कल्प ग्रंथ.



हे ब्राह्मणग्रंथाचे पुरवणी ग्रंथ होत. हे कर्मानुष्ठान प्रकाशक आहेत. कल्पसूत्रें तीन प्रकारची आहेत. १ श्रौतसूत्रें, २ गृह्यसूत्रें व ३ धर्मसूत्रें. प्राचीन सूत्र ग्रंथांतील विषय, व ब्राह्मणें आणि आरण्यकें यां मधील विषय एकच आहेत.

श्रौतसूत्रांत तीन अग्नीवर करावयाची कार्यें व त्यांचे मंत्र दिलेले आहेत. तसेंच अमावास्येस व पौर्णिमेस करावयाच्या इष्टी, ऋतुयाग, पशुयाग, व निरनिराळ्या तऱ्हेचे सोमयाग यांसाठीं लागणारे मंत्र दिलेले आहेत.

गृह्यसूत्रांतील विषय विविध असून मनोहर आहेत. एकाग्नीवरील गृह्य विधीची व जुन्या चालीरीतींची माहिती या सूत्रांत दिलेली आहे. जन्मसंस्कारा पासून अंत्यसंस्कारा पर्यंतचे सर्व त-हेचे संस्कार या सूत्रांत दिलेले आहेत. गृह्य सूत्रांत पंचमहायज्ञ सविस्तर रीतीनें दिलेले आहेत. श्राद्ध विधीहि यांत दिलेले आहेत.

धर्मसूत्रांत श्रौत व गृह्य सूत्रांतील मंत्रांचेच स्पष्टीकरण आहे. या सूत्रांत धर्माविषयीं माहिती असल्यामुळें यांना धर्मग्रंथ म्हणतात. यांत चातुर्वर्णाचे -

नियम, धर्म, आश्रम वगैरे वर्णिलेले आहेत.



या शिवाय शुल्ब सूत्रें आहेत. त्यांत यज्ञकुंडें कशी करावीत याची भूमितीच्या दृष्टीनें माहिती आहे. ह्याच भूमितीचा मूल ग्रंथ आहे.

ऋग्वेदाचें आश्वलायन श्रौतसूत्र, आश्वलायन गृह्यसूत्र, शांखायन श्रौतसूत्र, व शांखायन गृह्यसूत्र; कृष्णयजुर्वेदाचें - आपस्तंब गृह्यसूत्र, आपस्तंबश्रौतसूत्र, हिरण्यकेशी श्रौतसूत्र, हिरण्यकेशी गृह्यसूत्र, बौधायन श्रौतसूत्र, व बौधायन गृह्यसूत्र; शुक्ल यजुर्वेदाचें कात्यायन श्रौतसूत्र,

पारस्कर गृह्यसूत्र, व कात्यायन शुल्बसूत्र;
सामवेदाचें लाठ्यायन श्रौतसूत्र, गोभिल ९७
गृह्यसूत्र, व खादिर गृह्यसूत्र; अथर्ववेदाचें
वैतान श्रौतसूत्र, व कौशिक गृह्यसूत्र,
(या सूत्रांत अथर्ववेदाचें यथार्थ स्थान
दिलेलें आहे.) अशी सूत्रें आहेत.
सामवेदाच्या सूत्रांतच सामवेदाच्या ब्राह्मण
ग्रंथांचा समावेश होतो.

सूत्रग्रंथानंतर परिशिष्टें लिहिलीं
गेलीं. जी माहिती सूत्रग्रंथांत थोडक्यांत
दिलेली होती ती माहिती परिशिष्टांत
स्पष्ट करून मंत्रांचे सविस्तार विवरण
त्यांत केलेलें आहे. या नंतर प्रयोगपद्धति

व कारिका लिहिल्या गेल्या. त्यांत कोणत्या तरी एका वैदिक शाखेचे - 
यज्ञयागादि विधि दिलेले असतात. अशा ग्रंथांपैकी महत्वाचे ग्रंथ म्हणजे विवाह संस्कार, श्राद्ध, व अंत्यसंस्कार यां वरील ग्रंथ होत.

३ व्याकरण

व्याकरणा विषयीं जुनी वेदांगाची पुस्तकें नाहींत.

४ निरुक्त

हा ग्रंथ (कोश) यास्काचार्यांनीं केलेला आहे. निघण्टु हा कोशहि यास्कांनींच तयार केला.

हे दोन्ही ग्रंथ म्हणजे शब्द कोश आहेत.
वैदिक शब्दांचे अर्थ यांत स्पष्टपणें
दाखविले आहेत. निघंटूचे पांच
निरनिराळे कोश असून त्याचे तीन
विभाग आहेत.

## ५ छंदः शास्त्र.

हे गायत्र्यादि पादबद्ध छंद दर्शक
आहेत. या शास्त्राचा "पिंगल" नामक
ग्रंथ आहे. तो पिंगलानें लिहिला.
त्याचे दोन निरनिराळे पाठ आहेत.

## ६ ज्योतिःशास्त्र

वेदांग ज्योतिष हा ज्योतिषशास्त्रावरील
लहानसा ग्रंथ आहे.

वेदरूपी पुरुषाचें पूर्णज्ञान होण्यास या त्याच्या अंगांची माहिती पाहिजे. शिक्षा हें त्या वेदपुरुषाचें नाक, कल्प हे त्याचे हात, व्याकरण हें त्याचें तोंड, निरुक्त हे त्याचें कान, छंद हे त्याचे पाय, व ज्योतिष हे त्याचे डोळे कल्पिलेले आहेत.

—o—

८ वेदांची उपांगें.

वेदांची उपांगें सहा आहेत. यांनांच षट् ९८
दर्शनें किंवा षट्शास्त्रें म्हणतात. त्यांची
नांवें :- १ सांख्य, २ वैशेषिक, ३
न्याय, ४ योग, ५ पूर्वमिमांसा, व
६ उत्तरमिमांसा. (कित्येकांच्या मतें ~~न्याय,~~
१ पुराण, २ न्याय, ३ मिमांसा, ४ धर्मशास्त्र, हीं
चार वेदांची उपांगें आहेत.) याशिवाय
चार्वाक् दर्शन, बौध्ददर्शन, अर्हत् दर्शन,
रामानुजदर्शन, पूर्णप्रज्ञदर्शन, नकुलीपाशुपत
दर्शन, शैवदर्शन, प्रत्यभिज्ञा दर्शन,
रसेश्वर दर्शन, औलुक्य दर्शन, अक्षपाद दर्शन,

पाणिनी दर्शन, शांकरदर्शन वगैरे इतर दर्शनें हि आहेत. त्यापैकीं मुख्य सहा दर्शनांचा आपण थोडक्यांत विचार करूं.



अपूर्ण -

सांख्य दर्शन :-

याचा कर्ता कपिल महामुनि आहे.

सांख्य शब्द 'ज्ञान' अथवा 'तत्त्वज्ञान' या अर्थाने योजितात. सांख्य शास्त्रांत पंचवीस तत्त्वांची प्रथमच मोजदाद केली असल्यामुळें व पुढें हि अविद्या पांच प्रकारची, अशक्ति अठ्ठावीस प्रकारची, अतुष्टि सतरा प्रकारची, अशा रीतीने प्रत्येकाचे प्रकार त्या विवक्षित संख्येनें दाखविले असल्यामुळें त्याला 'सांख्य' हें नांव मिळाले.

(गणनेत मोजणारे शास्त्र)

हे निरीश्वरवादी आहे. यांत सत्कार्य १०१
वाद (म्हणजे एका सद्वस्तू पासून अनेक
सद्वस्तू) याचें महत्त्व आहे. वेदांत्यांचा
चा सत्कार्यवाद एका सद्वस्तू पासून
भासमान अनेक वस्तू होण्याचा आहे.
न्याय व वैशेषिक यांचा असत्कार्यवाद
म्हणजे सत् पासून असत् चीउत्पत्ती
हा आहे.

१ महत्, २ अहंकार व ३ ते ७ पंच तन्मात्रा (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, ) ही सात तत्त्वें
८ मन, ९ ते १३ पंच ज्ञानेंद्रियें (कर्ण, त्वचा, चक्षु, जिव्हा, घ्राण)
१४-१८ पंच कर्मेंद्रियें (हात, पाय, उपस्थ, गुद, वाक्)
१९-२३ पंच महाभूते (पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश.)

व बुद्धि आणि प्रकृति

ही पंचवीस तत्त्वें सांख्यांची आहेत. 

सांख्यांनी दुःखाचें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक असें त्रिविध वर्गीकरण केलें आहे.

प्रकृति व पुरुष हीं भिन्न भिन्न मानली आहेत. प्रकृति ही त्रिगुणात्मक, अविवेकी, अचेतन, विषय, प्रसवधर्मी व सामान्य आहे आणि पुरुष हा निस्त्रैगुण्य, विवेकी, सचेतन, विषयी, अप्रसवधर्मी व विशेष मानला आहे.

प्रकृति आणि पुरुष इतक्या भिन्न भिन्न स्वभावाचे असतां त्यांचा संबंध कसा होतो हा सांख्य शास्त्रांतील एक अवघड प्रश्न आहे. याचा स्पष्ट खुलासा कोठेंच केलेला नाही. प्रकृति पुरुषांचा संबंध पंगु आणि अंध यांच्या संयोगा सारखा असतो असें 'सांख्य कारिका' सांगते. म्हणजे प्रकृतीची कर्तृत्व शक्ति आणि पुरुषाचें चैतन्य यांची सांगड पडल्या बरोबर सृष्टीच्या कामाला सुरुवात झाली. असा याचा स्पष्ट अर्थ आहे. परंतु -

दृष्टान्त हा नैरमींचं संशयात्मक
असतो तसाच हाही आहे.

सत्त्व, रज, तम, यांची साम्यावस्था
म्हणजेच प्रलयावस्था व त्या साम्यावस्थेचा
बिघाड म्हणजेच सृष्टीचा उपक्रम होय.

बुध्दीला प्रकृतीनंतर परंतु अहं
काराच्या अगोदर स्थान दिलेलें आहे.
मनाचें कार्य उभयविध असतें:

बुध्दि, अहंकार, मन, पंच
ज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें आणि
पंच तन्मात्रा या अठरा तत्त्वांचें
लिंग अथवा सूक्ष्म शरीर तयार
होतें असें सांख्यांचें मत आहे.

व हेंच जननांतून मरणांत व
मरणांतून जननांत जात असतें.
बुद्धीचे (१) शुद्ध वैश्यात्मिक (लॉजिक)

आणि मानसिक व (२) बौद्धिक असे
दोन पर्याय मानले आहेत. हा भेद
ध्यानांत ठेवला म्हणजे सांख्य शास्त्र
समजणें सोपें जातें.

सांख्यशास्त्राची परिभाषा

ठरवून त्यास जसें जसें अधिकाधिक
शास्त्रीय स्वरूप येवूं लागलें तशी
तशी ईश्वराची आवश्यकताच वाटेनाशी
झाली. आणि म्हणून सांख्य ——
निरीश्वर ठरलें.

904

# वैशेषिक दर्शन :-

याचा कर्ता कणाद आहे. न्याय दर्शनाशीं याचें उत्कटच साम्य आहे. 'विशेष' नांवाचा एक नवीनच पदार्थ मानून त्याला कणादानें विशेष महत्त्व दिल्यामुळें या दर्शनाला 'वैशेषिक दर्शन' हें नांव पडलें आहे.

या दर्शनाचे दहा अध्याय आहेत व प्रत्येक अध्यायाचीं दोन आन्हिकें आहेत. पहिल्या अध्यायांत जातीचें व जातिविशेषाचें विवेचन आहे. दुसऱ्या अध्यायांत द्रव्यांचें निरूपण,

तिसऱ्यांत आत्मा व अंतःकरण यांची लक्षणें, चौथ्यांत शरीरवर्णन, पांचव्यांत कर्मप्रतिपादन, सहाव्यांत - श्रौतधर्मनिरूपण, सातव्यांत गुण समवाय प्रतिपादन, आठव्यांत ज्ञानोत्पत्ति व त्याच्या निदानाचें विवेचन, नवव्यांत बुद्धिविशेषाचें प्रतिपादन व दहाव्यांत आत्म्याच्या मुख्य गुणांचे भेद विशद करून दाखविले आहेत.

विश्वांतील सर्व पदार्थांचे द्रव्य, गुण, कर्म, सामान्य, विशेष, व समवाय असे सहा वर्ग केले आहेत. (अभाव हा सातवा वर्ग मानतात.) —

१०६

द्रव्याचे पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, काळ, दिक्, आत्मा, व मन असे नऊ पोटभाग आहेत. गुण चोवीस प्रकारचे आहेत. कर्माचे उत्क्षेपण, अपक्षेपण वगैरे पांच प्रकार आहेत. सामान्याचे पर व अपर असे दोन प्रकार असून सत्ता ही पर सामान्य व जाति ही अपर सामान्य असते. 'विशेष' हे अनंत आहेत. समवाय हा एकच व अभेद्य आहे. प्रत्येक द्रव्याचे परमाणु असतात हे कणादाचें खास मत आहे. परमाणु म्हणजे शेवटचा ~~त्याला भागता येत नाही~~ अभेद्य सूक्ष्म भाग.

वैशेषिकांना 'पीलुपाकवादी' म्हणतात.
पीलुपाक म्हणजे अणूंचा पाक होय. १०९
यांच्या विरुद्ध नैय्यायिकांचा 'पिठरपाक'
म्हणजे अणूंनीं बनलेल्या सर्व वस्तूंचा
पाक होय.

वैशेषिकांचा सर्व भर अणुवादावर
आहे. पण तो पुढें सांख्यांनीं व वेदां-
त्यांनीं खोडून टाकला आहे.

वैशेषिकांच्या मतें मन हें अणु
असून त्याचा आत्म्याशीं संयोग झाला
असतां ज्ञान प्रतीति होते. मन हें
आत्मा व इंद्रियें यांचा दुवा होय. हेंहि
मत वेदांत्यांनीं खोडून टाकलें आहे.

११०

## न्याय दर्शन :-

या न्याय दर्शनाचा कर्ता गौतम आहे. त्याला अक्षपाद हें दोपण नांव होते. या न्याय दर्शनाच्या आरंभीं गौतमाने तर्काला मूलभूत असे सोळा पदार्थ सांगितले आहेत. यथार्थ ज्ञान कोणत्या प्रकाराने होऊं शकेल या संबंधीची मीमांसा साही दर्शनांत आहे. तरीपण ती मीमांसा या न्याय दर्शनांत सांगोपांग केलेली आहे. यथार्थ ज्ञानाची चार साधनें

श्री

आहेत. १ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३
उपमान व ४ शब्द. त्यांत अनुमान
हेंच तत्त्वज्ञानाची प्राप्ति करून देणारें
श्रेष्ठ [illegible] साधन आहे. अनुमान तीन
प्रकारचें असतें. १ [illegible] पूर्ववत् अनुमान
(ढग आलेले आहेत तेव्हां पाऊस पडेल)
२ शेषवत् अनुमान (नदीला पूर आला (कोठेतरी) आहे त्या अर्थी उंच प्रदेशांत पाऊस पडला असावा.). ३ सामान्य अनुमान
(इंद्रियावरून इंद्रियत्वाचा निर्णय करणें)
(सामान्यावरून [illegible]). या दर्शनांत सामान्यावरून
विशेषाचा अनुमान करण्याचें (Deductive)

धोरण आहे. विशेषावरून सामान्याचें (Inductive) अनुमान करण्याचें पाश्चात्यांचे धोरण येथें रूढ नाहीं.

या अनुमानाची पांच अंगें आहेत. १ प्रतिज्ञा, २ हेतु, ३ दृष्टांत, ४ उपनय, व ५ निगमन.

पर्वताला वणवा लागला आहे ही प्रतिज्ञा. कारण तेथें धूर निघत आहे हा हेतु. धूर दिसतो तेथें अग्नि असतो हा दृष्टांत. पाकगृहांत आग्नि असतो हा उपनय. पर्वत म्हणून धूर दिसतो हें धूमवान आहे म्हणून तेथें वणवा लागला आहे. हा हें निगमन. चवथें व पांचवें

अगं ही पुनरुक्ति आहे म्हणून खरोखरी तीनच अंगें मुख्य आहेत.



न्यायदर्शनांत कार्यकारणवादाची कल्पना इतर दर्शनाहून थोडीशी भिन्न आहे. इतर दर्शनांच्या मतें कोणत्याही कार्याची - उपादान व नैमित्तिक - अशीं दोनच कारणें असतात. पण न्याय दर्शनांत तीन कारणें मानलेली आहेत. 'उपादान' कारणाच्या ऐवजी न्यायदर्शनांत 'समवायी कारण' हें कारणाचें पारिभाषिक नांव आहे. निमित्त कारण हें सर्व दर्शनांत रूढ आहे.

या दोन कारणां शिवाय 'असमवायी कारण' म्हणून तिसरें कारण आहे. पटामधील तंतु हें पटाचें उपादान म्हणजे समवायी कारण आहे. पट विणणारा, हत्यारें हें बाह्य म्हणजे नैमित्तिक कारण आहे. तंतूंचें लहानमोठेंपण, जाडी, पातळी, हे पटाचे असमवायी कारण आहे.

यां शिवाय तर्क, निर्णय, हेत्वाभास, छल, स्वव्याघातक, निग्रहस्थान इत्यादि अंगभूत विषयांचेंहि विवेचन न्याय दर्शनांत आलें आहे. हें दर्शन सेश्वरवादी आहे.

# योगदर्शन.



पाद

पतंजलीने योगशास्त्रावर योग दर्शन नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. या दर्शनाचे चार पाद असून त्यांत १९५ सूत्रें आहेत. चित्तवृत्तींचा निरोध करणे ही योगाची व्याख्या दिली आहे. समाधिपादांत समाधीचें सविस्तर वर्णन केलेलें आहे. दुसऱ्या पादांत तपः स्वाध्याय आणि ईश्वरप्रणिधान या क्रियायोगानें चित्ताची यम नियमादि पांच साधनें सांगितली आहेत. विभूतिपादांत धारणा, ध्यान

व समाधि या तीन अंतरंग
साधनांचे वर्णन असून त्याशिवाय ११६
विभूतींचेहि वर्णन त्यांत आलें आहे.
पवथ्यापदांत जन्म, औषधी, मंत्र,
तप, व समाधी यांच्या पासून
प्राप्त होणाऱ्या पांच सिध्दींचें वर्णन
असून शेवटीं या शास्त्राचें मुख्य
प्रयोजन जो मोक्ष त्याचेंहि विवेचन
आलें आहे. योगदर्शन हें सांख्या
प्रमाणेंच पंचवीस तत्त्वें मानतें, पण
ह्या पतीकडे जाऊन परमेश्वर हा
सव्वीसावें तत्त्व आहे. असें हि
या योग दर्शनांत म्हटलें आहे.

या पुढें या दर्शनाला 'सेश्वरसांख्य' असेंहि नांव देण्यांत आलें आहे. ११९

# मीमांसा

मीमांसेचें ज्ञान नसेल, अथवा गैरसमजानें भलताच अर्थ कळला असेल तर न्याय पद्धतींत मोठाच प्रमाद घडतो, म्हणून मीमांसेचें ज्ञान असणें आवश्यक आहे. वैदिक वाङ्मयाच्या विषयाचे सहजगत्या दोन भाग पडतात. एक धर्म व दुसरा तत्त्वज्ञान. यालाच अनुक्रमें कर्मकांड व ज्ञानकांड म्हणतात. जैमिनीची पूर्वमीमांसा कर्मकांडात्मक (धर्म) वेदाज्ञांचा विचार करते व

## बादरायणाची उत्तर मीमांसा

ब्रह्मविचार करणाऱ्या वेदभागाची
मीमांसा (चिकित्सा) करते. या
दोनहि मीमांसांनी मिळून समग्र
वेदराशी उलगडला आहे. कर्मकांडात्मक
वेदराशी वेदांतापेक्षां कितीतरी
पटीनें मोठा आहे; म्हणून पूर्वमीमांसेचें
क्षेत्र अतिशय विस्तृत आहे..
उपनिषदें हें वेदाचें शेवटचें प्रकरण
आहे. यांसच वेदांत म्हणतात. या
वेदांताचाच विचार उत्तर मीमांसा करते.
वैदिक वाङ्मयाचें मनन करण्याकरितां,

प्रांतीला विचारांची संगति लावण्या
करितां मीमांसा शास्त्र उत्पन्न झालें
आहे. दोनहि मीमांसा प्राचीन
वैदिक आर्यांच्या सूक्ष्म तर्कशास्त्राचे,
भाषेच्या प्रगल्भ विवेचन प्राविण्याचें,
आणि गहन तत्त्वज्ञानाच्या —
पांडित्याचे आदर्श आहेत.

# पूर्वमीमांसा.

हा ग्रंथ जैमीनीनें केलेला आहे.
अर्थ निर्णयाचे नियम अपनेच पूर्व
मीमांसा. या पूर्वमीमांसेचे बारा
अध्याय आहेत. प्रत्येक अध्यायांत
चार पाद असतात. तिसऱ्या व
सहाव्या अध्यायांत मात्र आठ
पाद आहेत. प्रत्येक पादांत कांहीं
आधीकरणें असतात. आधीकरण
म्हणजे कोणत्याहि एका मुद्याची
साधक बाधक अशी संपूर्ण चर्चा होय.
आधीकरण एक किंवा अनेक सूत्रांचे
बनलेलें असतें.

१२२

जैमीनीची पूर्वमीमांसासूत्रेंच हल्ली उपलब्ध आहेत. त्यांवर शबरस्वामीचें विस्तृत भाष्य आहे त्या भाष्यावर कुमारिल भट्टाची वार्तिकें व प्रभाकराची वृत्ति आहे.

पूर्वमीमांसेंत एक स्वतंत्र तत्त्वज्ञान आहे. धर्माचें यथार्थ ज्ञान करून देण्या करितां वेदांचा उपयोग करावा लागतो. वेदांचा उपयोग कसा करावा तें मीमांसा शिकविते. कारण मीमांसेंत वेदांच्या अर्थ निर्णयाचे नियम आहेत. अर्थांत मतभेद झाला कीं त्याचा निर्णय मीमांसा शास्त्र करतें.

मीमांसेत अर्थ निर्णयार्थ उपयोगी
नियम दोन तऱ्हेचे आहेत. एक
कोणत्याहि विधानास, निरूपणास,
प्रतिपादनास, लेखास, किंवा ग्रंथास
लागू पडणारे असे सर्व सामान्य नियम;
आणी दुसरे केवळ धार्मिक ग्रंथासच
लागू पडणारे नियम.

कोणत्याहि शब्दाचे 'वाच्य'
किंवा 'लक्ष्य' असे दोन अर्थ
होऊं शकतात. प्रारंभ, समाप्ति,
वारंवार केलेला निर्देश, वैशिष्ट्य,
प्रयोजन, अर्थवाद आणी चिकित्सा

हीं ~~[illegible]~~ तात्पर्य निर्णयाची साधनें आहेत. क्रिया, वस्तु, आणि प्रतिपादन यांतील क्रमा संबंधीं अनेक स्पष्ट नियम या मीमांसेंत सांगितले आहेत.

वेद केवळ क्रियाच सांगतो. विधी अथवा निषेध हे धर्मशास्त्राचें मुख्य प्रतिपाद्य आहे. पूर्वमीमांसक आचार्य ईश्वर, स्वर्ग, व मोक्ष यांना गौण ~~[illegible]~~ ठरवून विधी व निषेध, सत्कर्म अथवा असत्कर्म, हेंच धर्मशास्त्र प्रतिपाद्य विषय आहे असें मानतात. पूर्वमीमांसकांची परंपरा

वेदापर्यंत नाऊन भिडते. वैदिक
विचारसरणींत समाजसंस्थेला
पुरस्वत्व आहे. समाजसंस्थेचा
क्रिया अथवा विधीनिषेध हा
मुख्य आधार आहे. क्रिया हें मध्य
वर्ती सूत्र ठरविल्यानंतर त्यासंबंधीं
शेंकडों उपनियम अथवा न्याय
मीमांसेंत सांगितले आहेत. मीमांसकांनीं
वेदांचें पृथक्करण केलें आहे व
विरुद्ध वचनांची संगती कशी लावावी
यासंबंधीं पुष्कळ विवरण केलें
आहे. या पूर्वमीमांसेनें जी —

अर्थनिर्णय पध्दति मीमांसिली आहे
तिचा उपयोग उत्तर मीमांसेनें
भरपूर केला आहे.

१२५

# उत्तर मीमांसा.

१२८

बादरायणांच्या ब्रह्मसूत्रांना उत्तर मीमांसा हें नांव आहे. यांत वेदांताचा विचार आहे. याविषयावर अनेकांनी अनेक ग्रंथ लिहिले आहेत. व सर्व धर्माचार्यांनी यावर भाष्ये केली आहेत. हे जग नामरूप क्रियात्मक आहे. व हा सर्व पसारा मायेचा आहे. व हें सर्व चेतनाचें विवर्त आहे. या जगाला अभिन्न निमित्तोपादान कारण ईश्वर आहे. ईश्वर मायाविशिष्ट चेतन आहे व जीव अविद्याविशिष्ट चेतन आहे. बंधाचा हेतु अविद्या आहे.

अविद्याकार्य हा याचा (जीवाचा)
बंध आहे. याचा परमानंद मोक्ष
आहे, व ब्रह्मात्मैक्य ज्ञान हें
मोक्षाचें साधन आहे. मलविक्षेपदोष
रहित, व चतुष्टयसाधन संपन्न असा
जो तो याचा अधिकारी असतो.
ज्ञानकांड हें यांत प्रधान आहे. व्यावहारीक
जगात व तत्त्वज्ञान पूर्वक मोक्ष हा
याचा उपयोग आहे. सारांश हाच कीं
ज्ञानयुक्त सर्व कर्मे करावीत व तीं निष्काम
असावीत.

या सर्व शास्त्रांत (उत्तरमीमांसेंत) ज्ञेय पदार्थ ब्रह्म आहे. याचे (या मीमांसेचे) १ समन्वय, २ अविरोध, ३ साधन व ४ फल असे चार अध्याय आहेत. 128

प्रत्येक अध्यायाचे चार पाद आहेत. व प्रत्येक पादांत अधिकरणें आहेत.

अधिकरणें याचा अर्थ पांच अवयवांचा बनलेला वाक्य समुदाय असा आहे.

या अवयवांची नांवें :-

१ विषय = ज्याचें प्रतिपादन करावयाचें असेल तें विचार योग्य वाक्य.

२ विशय = संशय. हें असें आहे की नाही असा विकल्प.

३ पूर्वपक्ष = युक्तिवादअर्पणें. तत्त्वप्रतिपादक

४ उत्तरपक्ष = सिद्धान्त. सत्पक्षनिर्णय.

५ संगति = संबंध.

अशी आहेत.

१ उपवेद. 

चार वेदांचे मुख्य उपवेद चार आहेत.
ऋग्वेदाचा उपवेद आयुर्वेद आहे. आयुर्वेदाचे
ग्रंथ चार आहेत ते (१) माधवनिदान, (२)
वाग्भट (अष्टांगहृदय), (३) चरक, ~~(४)~~ व (४)
सुश्रुत. यजुर्वेदाचा उपवेद धनुर्वेद आहे.
सामवेदाचा गांधर्ववेद (संगीतशास्त्र) हा
उपवेद आहे; आणि अथर्ववेदाचा स्थापत्य
वेद म्हणजे अर्थशास्त्र हा उपवेद आहे. या
शिवाय अथर्ववेदाचे पांच उपवेद आहेत
ते (१) सर्पवेद, (२) पिशाच्चवेद, (३) असुरवेद,
(४) इतिहासवेद व (५) पुराणवेद.

# आयुर्वेद

हा ऋग्वेदाचा उपवेद आहे. यांत प्रकृति निरोगी कशी राखावी, आरोग्य बिघडविणाऱ्या गोष्टी कोणत्या, शक्य तितकी काळजी ठेवूनहि रोग झालाच तर त्यावर उपचार कोणते, वगैरे गोष्टींचे पूर्ण ज्ञान आहे. यालाच 'आर्यवैद्यक' असेंहि नांव आहे.

आयुर्वेदाचें ज्ञान प्रथम ब्रह्मदेवानें दक्षाला, दक्षानें अश्विनी कुमारांनां, व अश्विनी कुमारांनीं इंद्राला दिलें. पृथ्वीवर मानव जेव्हां रोगांनीं पीडित झाले तेव्हां सामाजिक कार्याला पिढयान पिढया वाहून घेणारे जे आत्रेऋषि त्यांनीं इतर ऋषींना बरोबर घेऊन इंद्राची प्रार्थना केली

व त्याच्या पासून आयुर्वेदाचें ज्ञान मिळविलें. या ऋषींनीं आपल्या शिष्यांना तें ज्ञान 
शिकविलें व प्रत्येकाने आप आपल्या अनुभवा प्रमाणें या विषयावर ग्रंथ लिहिले. या वेदाच्या दोन शाखा आहेत. एक केवळ औषधोपचारानें रोग बरा करण्याची व दुसरी शस्त्र क्रिया करून रोग बरा करण्याची. चरक आणि वाग्भट हे औषधोपचारानें रोग बरा करणार आहेत, व सुश्रुत आणि धन्वंतरी हे शस्त्रक्रियेनें रोग बरा करणार आहेत.

चिकित्सेची मुख्य स्थानें आठ आहेत तीं :- (१) पूर्ण वाढलेलें शरीर, (२) बालशरीर,

(३) भूतपिशाच्च, ग्रह वगैरेंची पीडा, (४) डोकें, डोळे, कान, नाक, घसा यांचें विवेचन. (या चारांना उर्ध्वांगचिकित्सा म्हणतात.). (५) शल्यादि पीडा, (६) दंष्ट्रा चिकित्सा, (७) जरा चिकित्सा व (८) रसायन प्रयोग. या शिवाय मानसिक रोगांचा हि विचार केलेला आहे. वात, पित्त व कफ यांचें साम्य असणें हें आरोग्याचें मुख्य लक्षण आहे. व्याधींचे साध्य व असाध्य असे दोन भेद कल्पिले आहेत. साध्यांत दोन प्रकार आहेत. एक सुखसाध्य व दुसरा कष्टसाध्य. —

सा

आयुर्वेदाच्या नियमाप्रमाणें शरीराची काळजी ठेवल्यास मनुष्य अल्पायुषी न होतां तो आपल्या आयुर्मर्यादेपर्यंत सुखानें जगूं शकतो. वैद्यांची लक्षणें हि यांत दिलेलीं आहेत. वैद्य अनुभवी. प्रेमळ व शुचिर्भूत असावा. औषधांचे प्रकारहि यांत दिलेले आहेत. एक ताज्या औषधी वापरणें व दुसरा रसायन. वैद्याप्रमाणेंच त्याचा परिचारक (compounder) कसा असावा त्याचीहि लक्षणें दिलेलीं आहेत.

# धनुर्वेद.



धनुर्वेदांत युध्दशास्त्राचा विचार केला आहे. यांत शस्त्रें, अस्त्रें, युध्द करण्याच्या पध्दति, व्यूहरचना इत्यादि गोष्टींची माहिती आहे. अत्यंत प्राचीन काळीं युध्द कला ही वेदांत सामिल झालेली आहे. हें फारच उपयुक्त शास्त्र आहे, व याच्याच ज्ञानाच्या बळावर राष्ट्रें टिकूं शकतात. रथ, गज, अश्व, व पदाति यां वरून धनुर्वेद चतुष्पाद गणला आहे. धनुर्वेदांत युध्दाची पुढील प्रमाणें पांच अंगें दिलेली आहेत. १ यंत्रमुक्त, २ पाणिमुक्त, ३ मुक्तसंधारित,

४ अमुक्त व ५ बाहुयुद्ध. त्याचप्रमाणें
१ शस्त्रसंपत्ति व २ अस्त्रसंपत्ति असेहि
युद्धाचे दोन प्रकार आहेत. ऋजुत्व
म्हणजे सरळपणा व मायावित्व म्हणजे
कपटानें लढणें [असेहि] किंवा गनिमीकावा
असेहि युद्धाचे प्रकार आहेत. हेंहि शास्त्र
फार मोठें आहे व फार उपयुक्तहि आहे.

क्षं

१३८

## गांधर्ववेद

गांधर्ववेदांत संगीतशास्त्राचा विचार केला आहे 'गायनं पंचमो वेदः' या वचना प्रमाणें हा पांचवा वेदच मानला आहे. याचा विस्तार फार मोठा आहे.

## अर्थवेद

अर्थवेदांत अर्थशास्त्राविषयीं माहिती दिलेली आहे.

१० वेदांत.

वेदांत म्हणजे उपनिषदें. एकंदर १२८ 13e
उपनिषदें आहेत. त्या पैकीं १०८ हीं
त्या त्या वेदाला अनुसरून आहेत.
(ऋग्वेद, कृष्ण यजुर्वेद शुक्ल यजुर्वेद,
१० + 32 + १९
सामवेद, अथर्ववेद, व
+ १६ + 31 = १०८
बाकीची २० स्वतंत्र आहेत.)
ब्रह्मसूत्रांत उपनिषदांतील भिन्न भिन्न
सूत्रांची एकवाक्यता केलेली आहे.
उपनिषदें, ब्रह्मसूत्रें, व भगवद्गीता
या तीघींना "प्रस्थानत्रयी" म्हणतात.

या सर्व उपनिषदांत दहा उपनिषदे मुख्य मानतात. कारण या दहांतच सर्व उपनिषदांचें सार आलेलें आहे व या दहाही उपनिषदांचें सार टीका श्रीमद्भगवद्गीतेंत आलेलें आहे. दहा उपनिषदांची नांवें :- १ ईश, २ केन, ३ कठ, ४ प्रश्न, ५ मुंडक, ६ मांडूक्य, ७ तैत्तिरीय, ८ ऐतरेय, ९ छांदोग्य, व १० बृहदारण्यक.

१४०

सर्व उपनिषदें जरी संकलित प्रबंध या दृष्टीनें ब्राह्मणाच्या शेवटीं जोडलेलीं

१४४

आहेत तरी ती कर्मकांडाशीं तत्त्वतः
विरुद्ध-धर्म विचाराची द्योतक आहेत.
यज्ञ यागादि करून ऐहिक व पार
लौकीक सुख मिळवावें असा त्यांचा
मुळींच हेतु नाही. यथार्थ ज्ञानाच्या
योगानें जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य
होऊन मुक्त व्हावें हेंच उपनिषदांचें
ध्येय आहे. ब्राह्मणग्रंथांचें ध्येय यज्ञ
यागादि करून सुख मिळवावें हें आहे.
म्हणून उपनिषदांत कर्मकांड निरुपयोगी
होऊन ज्ञानकांडालाच संपूर्ण महत्त्व मिळालें आहे.

मुद्दा हा कीं कर्माचा हेतु कर्मफल नसून अंती मोक्ष साधणें म्हणजे इह परलोकी "स्वतंत्र" असणे हा आहे.

अंतिम ध्येय जरी 'मोक्ष' हे असलें तरी भिन्न भिन्न मतांमुळें निरनिराळे वैदिक सांप्रदाय रूढ झाले.

१ अद्वैत :- हा जगद्गुरु आद्य श्रीमच्छंकराचार्यांचा सांप्रदाय शके ७१० नंतर सुरू झाला. यांत मायामिथ्यात्ववाद - संन्यास - निवृत्तिमार्ग यांचें विवेचन आहे. मनुष्याचा आत्माच

मुळांत परब्रह्मरूपी असतो, या ऐक्याचे ज्ञान झाल्या खेरीज मोक्ष नाहीं. परब्रह्मा १७ खेरीज दुसरी कोणतीहि वस्तु सत्य नाहीं हा या सांप्रदायाचा मुद्दा आहे.

2 विशिष्टाद्वैत :- हा श्री रामानुजाचार्यांचा सांप्रदाय शके ९३८ नंतर सुरू झाला. माया मिथ्यात्ववाद व अद्वैत सिध्दान्त हीं दोन्हीं खरी नसून जीव, जगत् व ईश्वर हीं तीन तत्वें जरी भिन्न असलीं तरी जीव (चित्) व जगत् (अचित्) हीं दोन्हीं एका ईश्वराचेंच शरीर

असल्यामुळे चिदचिद्विशिष्ट ईश्वर एकच होय. ईश्वर शरीरांतील या सूक्ष्म चिदचिदापासून पुढें स्थूल चित -(अनेक जीव), अचित् -(जगत्) निर्माण होतात असें या सांप्रदायाचें मत आहे.

१२८

3 ~~द्वैती~~ द्वैत:- हा श्री मध्वाचार्य ऊर्फ श्रीमदानंद तीर्थ यांचा सांप्रदाय शके १०७१ नंतर सुरु झाला. परब्रह्म व जीव सदैव भिन्नच असतात असें या सांप्रदायाचें मत आहे.

४. द्वैताद्वैत :- हा श्रीनिंबार्कांचा सांप्रदाय शके १०८४ नंतर सुरु झाला. जीव, जगत् व ईश्वर हे जरी भिन्न असले तरी त्यांचें अस्तित्व व व्यापार ईश्वरावर अवलंबून आहेत, म्हणून मूळ ईश्वरांतच त्यांचा समावेश आहे असें या सांप्रदायाचें मत आहे.

५ शुद्धाद्वैत :- हा श्री वल्लभाचार्यांचा सांप्रदाय शके १४०१ नंतर सुरु झाला. मायाविरहित शुद्ध जीव व परब्रह्म हीं एकच आहेत. दोन नव्हत. परमेश्वराचा अनुग्रह म्हणजेच पुष्टि. या सांप्रदायाला पुष्टिमार्ग-

पोषणमार्ग - भक्तिमार्ग ही नांवें आहेत.

१२८

सर्व वेदांतचें सारभूत अशी जी श्री भगवद्गीता त्या गीतेचे १८ अध्याय आहेत, ते सर्व अध्याय एका श्लोकांत ग्राथित केलेले आहेत :

एकश्लोकी गीता

वैराग्योदय[1], सांख्य[2], कर्मकरणें[3], तें सर्व ब्रह्मार्पण[4] ।
न्यासादि[5], त्रिकोणें[6], ज्ञानयुक्त बनणें[7], ब्रह्मादि[8], राजेगुण[9] ॥
योगी[10] अंशज, विश्वरूप[11], भजणें[12], देही[13], गुणी[14], ईशा मी[15] ।
ही दैवासुर[16], आस्तिधीत्रय[17], खरी संन्यास[18] गीता असी ॥१॥

टीप :- १ अर्जुन विषादयोग. २ सांख्ययोग. ३ कर्मयोग. ४ ज्ञानकर्म संन्यास योग. ५ कर्मसंन्यास योग.

ईशा मी १५ ईशासे, गीता असे ॥१॥

टीपसूची

६ आत्मसंयमयोग, ७ ज्ञानविज्ञानयोग, ८ अक्षरब्रह्म योग, ९ राजविद्याराजगुह्य योग, १० विभूति योग, ११ विश्वरूप दर्शनयोग, १२ भक्तियोग, १३ क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग, १४ गुणत्रयविभाग योग, १५ पुरुषोत्तमयोग, १६ दैवासुरसंपद्विभाग योग, १७ श्रद्धात्रयविभाग योग, १८ मोक्षसंन्यास योग.

भाग

# ११ वेदांतील कांही उतारे.

ऋग्वेद.

जो परमपूज्य परमेश्वर (अग्नि) यज्ञमार्गाचा अग्रणी आहे, जो यथा कालीं यज्ञकर्म करविणारा ऋत्विज आहे, प्रत्येक दिव्य विभूतीला यज्ञांत निमंत्रण करून हविर्भाग पोहोंचविणारा जो आचार्य आहे, आणि असंख्य रत्नांचा निधि ज्याच्या जवळ असुन तो निधि जो भक्तांना विपुल देतो, अशा अग्नीचें मी भक्तिपुरःसर स्तवन करितों-

(ऋग्वेद मंडल १ ~~अष्टक - अध्याय - वर्ग १ - १ - १~~
सूक्त १.)

ऋग्वेद अष्टक १ - अध्याय १ - वर्ग १

ऋ॰ १

हे अग्निदेवा, हे आंगिरसा, भक्तांना
जें कांहीं मंगल ~~आशीर्वचन~~ आशीर्वचन
तूं देशील तें तुझेंच आशीर्वचन
सत्य होते यांत शंका नाहीं. (ऋ. ~~१.१.१.१~~ मं.१ सू.१)

हे वायुदेवा, तुझ्या विश्वसंचारी
निनादाचें श्रवण म्हणजे सर्व कामना
परिपूर्ण होण्याचें पूर्वचिन्हच होय
(ऋ. १ मं. सू. २)

वायुदेवा, तुझें आणि इंद्राचें
शौर्य अनुपम आहे. तुम्हांचा निःपात
करणास जो वरुण त्यासही मी भक्तीनें
आळवितो. (ऋ. १ मं. सू. २)

अश्वीहो, असंख्य भक्तांना तुमचाच
आधार आहे. (ऋ. १ मं. सू. ३)

इन्द्रा, मी तुला ध्यान भक्तीने आळविले
आहे म्हणुन तूं इकडे ये. (ऋ. [illegible])

भक्तांनीं अन्तःकरणपूर्वक गायिलेली
स्तोत्रें हें सरस्वती देवीचें वैभवच होय.
(ऋ. [illegible])

ही सरस्वती बुद्धीच्या प्रकाशाने
ज्ञानाच्या महासागराची आम्हांस स्पष्ट
कल्पना करून देते. तसेंच या विश्वा
मध्यें बुद्धि म्हणुन जेथें जेथें आढळते
तेथें तेथें साम्राज्य करणारी अधीष्ठात्री
सरस्वतीच होय. (ऋ. [illegible])

हे इन्द्रा, आमचा निश्चय एकच कीं
आम्ही तुझ्याच आश्रय छत्राखालीं
रहाणार (ऋ. [illegible])

हे इंद्रा, तूं भीषण आहेस म्हणुन जेथें जेथें साहसी कृत्यें होत असतात, आणि हजारो वीर झुंजतात तेथें तेथें आपल्या भीषण आयुधांनीं आमचें रक्षण कर.

इंद्रच आमचा सहाय्यकर्ता आहे.

ह्या जगताचा स्वामी इंद्र सर्व मानवांचा संतोष देवून त्यांस आपल्या सामर्थ्यानें पुढें जावयास प्रवृत्त करतो.

सर्व जगत्, सर्व संपत्ति, आणि पांचाहि लोक या सर्वांवर एकट्या इंद्राचेंच प्रभुत्व आहे. (ऋ. १-१०१-१६)

142

हा वज्रधारी इंद्र नुसता श्रेष्ठच कार्य,
पण पराक्रमहि आहे. त्याचें महत्त्व
असेंच चिरकाल रहाणार, त्याचें
उत्कट सामर्थ्य आकाशा सारखें अपार
आहे. (ऋ. मं. १ सू. [illegible])

इंद्रा, इकडे आगमन कर, आमच्या
कवनांची वाखाणणी कर, त्यांना चांगलें
ऐक, त्यांच्या बद्दल [illegible] प्रशंसापर
उद्गार काढ. दिव्यनिधे देवा,
आमच्या प्रार्थनेचा स्वीकार कर, आणि
यजमानांच्या उत्कर्ष कर. (ऋ. मं. सू. [illegible])

समुद्रापेक्षांही व्यापक अशा इंद्राचें १५३
यश विश्वांतील अखिल स्तुतिवचनांनीं
दिग्दिगंत केलें आहे. रथारूढ शूरांमध्यें
हा अत्यंत शूर आहे, सर्व सत्त्वसाध
र्थांचा हा अधिपति आहे. सर्व
महारथ्यांत हा अत्यंत श्रेष्ठ आहे.
(ऋ. मं. १ सू. ११)

इंद्राजवळ (ज्ञानरूपी) गोधन संपत्ति इतकी
अपार आहे कीं आपल्या भक्तांना तो
पराक्रमाचें आणि ज्ञानरूपी गोधनाचें
वैभव जरी एक सारखें देत राहिला तरी
त्याच्या भरपूर दातृत्वाला अथवा

संरक्षण शक्तीला कधीही खंड पडणार नाही. (ऋ. मं. २ सू. ११)

विश्वावर साम्राज्य चालविणाऱ्या इंद्रवरुणांची मी करुणा भाकतों. ज्यांना शरण गेलें म्हणजे ते आप्तांस अत्यंत श्रेष्ठ असें सुख प्राप्त करून देतात. (ऋ. मं. २ सू. ११)

ऋभु देवांनी आपल्या सामर्थ्याने मातापितरांना पुनः तरुण केलें. (ऋ. मं. २ सू. २०)

सर्व स्तुतींचा नाथ, सर्व यागांचा स्वामी, सर्व जलौषधींचा प्रभु, जो रुद्र त्याच्या जवळ कल्याणेच्छु भक्त

जे सुख मागतो त्याच सुखाची आशी याचना करितो. (१ ... ३३)

जे उद्योगशील आहेत आणि त्यांना धन मिळविण्याची इच्छा आहे त्यांना उषा देवी आपापल्या कामास प्रवृत्त करिते. (ऋ. १ .. ४८)

हे सूर्या, तूं प्रकाश देणारा, सर्वांत अत्यंत सुंदर, आणि सर्व संचारी आहेस. या अखिल जगावर तूं प्रकाश पाडून त्यास उज्ज्वलता आणतोस (ऋ. १ -- ५०)

अग्नी जागृत आहे, सूर्य क्षितिजांवर उदय पावण्याच्या बेतांत आहे, श्रेष्ठ आणि सुखकर उषा आपल्या तेजानें

१५५

सुप्रकाशित झाली आहे, आणि अशी देवही रथ जोडून निघण्याच्या तयारीत आहे, अशा वेळीं जगत्प्रेरक परमात्म्यानें आणि मानवांनाही आपल्या उद्योगास त्रावण्या करितां जागृत केलें आहे.

(ऋ. मं. १ सू. १५८)

हे स्तोतृजनहो, सकल धर्म-व्यवस्थेचें जें पुरातन मूलस्वरूप तें हाच विष्णु होय. (ऋ. मं. १ सू. १५६)

त्रिभुवनांचा अधिपति आणि शास्ता जो विष्णु त्यानें आर्ययजमानास सुखी केलें, आणि श्रेष्ठ धर्माचा वारेकरी करून त्याची उन्नति केली. (ऋ. मं. १ सू. १५६)

समुदायांचा प्रभु म्हणून तूं गणपति,
ज्ञानी जनांत तूं अत्यंत ज्ञानी, ज्याची
कीर्ति अत्यंत उत्कृष्ट त्यांच्या पदवेंही
तूं श्रेष्ठ, तूं राजाधिराज, तुजला
आम्ही आदरानें बोलावितों. हे स्तुतीच्या
प्रभो ब्रह्मणस्पते, आमची हांक ऐकून
आपल्या सर्व शक्तींसह त्वरेनें ये, आणि
आ आसनावर विराजमान हो. ~~(ऋ. मं. २ सू. २३)~~
तूं लोकांना ~~[illegible]~~ सदाचरणाच्याच
मार्गानें नेऊन त्यांचें रक्षण करतोस;
जो तुझी अनन्य भावानें भक्ति करतो
त्याला पातक स्पर्शही करूं शकत नाहीं.

(ऋ. मं. २ सू. २३)

१५८

हा पहा देदीप्यमान सविता. जगाचें प्रवर्तन आणि नियमन करणारा हा पवित्र देव ~~प्राणी~~ आणि प्राण्यांना प्रेरणा करण्या करितां उदय पावला आहे. हा त्याचा व्यवसाय अव्याहत चालला आहे. (ऋ. मं. 2 सू. 36)

जगाचें कल्याण करण्याकरितां हा सविता देव सदैव उभाच आहे. (ऋ. मं. 2 - सू. 36)

सर्व ठिकाणीं प्रवास करण्यास सोइस्कर असें ठिकाण म्हणजे समुद्र. (ऋ. मं. 2 - सू. 36)

१५८

हे अग्नि, तो वरुण सद्धर्मरक्षक, चराचर पालक, विश्वाचा राजा, आणि सकल मानवांचा अधीपति आहे. तर अशा त्या वरुणाला आमच्याकडे घेऊन ये. (ऋ. मं. ४ सू. १) भक्त कैवारी जो भगवान् वरुण त्याला इकडे आण. (ऋ. मं. ४ सू. १)

हा आनंदरूप आणि अत्यंत ज्ञानी असा आणि आपल्या भक्त मंडळांत विराजमान झाला आहे. (ऋ. मं. ४ सू. ६) अचल आणि श्रेष्ठ अशा ऐश्वर्याचा जो स्वामी त्या इंद्राचेंच आम्ही आमच्या यशासाठे पद्यें यशस्तवन करूं (ऋ. मं. ४ सू. २१)

प्रकाश धेनूचें उद्गमस्थान अत्युच्च
देवलोकीं आहे, आणि सनातन सत्य
मार्गानेंच सरमेनें ह्या प्रकाशधेनूचा
शोध लावला. (ऋ. मं. ५ सू. ४५)

तो वीरपुंगव पर्जन्य गडगडाट करून
तात्काळ वर्षाव करितो आणि औषधी
वनस्पतीमध्यें आपलें वीर्य बीजरूपानें
प्रविष्ट ~~करून~~ देतो. (ऋ. मं. ५ सू. ८३)

इंद्राविष्णुहो, तुमच्या पराक्रमाचें
वर्णन किती म्हणून करावें? पहा सोम
रसाच्या हर्षभरांत हें सर्व विस्तीर्ण त्रैलोक्य
तुम्ही आक्रमण केलेंत! हें अफाट अंतरिक्ष
तुम्हीं निर्माण केलेंत; आणि आमच्या

जीवनासाठीं हे भू आणि रजोलोक तुम्हीं विस्ताऊन दिलेत. (ऋ. मं. ८ सू. ८८)

१६९

दुसऱ्याचें धन (त्याने आपणांस कितीही दिलें तरी तें) परिमितच असणार. तें अपुरेंच पडणार. म्हणून जें धन नित्य अणि जें चिरंतन आहे त्याचेंच आम्हांस स्वामित्व दे. कारण दुसऱ्याचें मूल आपलें वंशज होत नाहीं. तसेंच दुसऱ्याचें धन आपली मिलकत नव्हे. (ऋ. मं. ७ सू. ४). दिव्य विबुधांनो, तुम्ही आपल्या मंगल आशीर्वादांनीं आमचें सदैव रक्षण करा. (ऋ. मं. ७ सू. ९)

शत्रूंचा दर्प नष्ट करणारा तो हा सविता देव, दिव्य निधींचा अधिपति, भक्तांना अभीष्ट धनाच्या प्राप्तीसाठीं प्रेरणा करतो; आणि आपल्या विस्तृत दीप्ति प्रकर्षाची प्रतीति दाखवून मानवांच्या निर्वाहाला अवश्य त्या वस्तु त्या त्यांना ~~देवून~~ देऊन टाकतो. (ऋ. मं. ४ सू. ५४)

वरुणाला सम्राट म्हणजे विश्वाचा चक्रवर्ती व इंद्राला स्वराट् म्हणजे सकल विश्व स्वाधीन ठेवणारा असें म्हणतात (ऋ. मं. सू. ७ ८२)

उंचवटयावरून भुसंडीमारून रवाली
धांवत येणाऱ्या वृषभाप्रमाणें ज्याची
धडक, जो जरामृत्युरहित, जो धेनु
प्रमाणें परोपकारी, जो चराचरांना
आक्रांत ठेवणारा, द्वेष आणि राग
असे दोन्हीं यथायोग्य रीतीनें —
दर्शविणारा, आणि ऐहिक [illegible] व
पारत्रिक अशा दोन्ही प्रकारच्या
ऐश्वर्यानें मंडित असा अति उदार
जो परमेश्वर इन्द्र त्याचें स्तवन करा.

(ऋ. मं. ८ सू. १)

हे उत्तम आयुधधारी सोमा, उभयलोकांतील
ऐश्वर्य आमच्याकडे वहात आण, आणि
आम्हांस श्रेयसोत्सुक करा. (ऋ. मं. ९ सू. ४)

सूर्य हा उष्णतेनें तळपणारा आहे,
दूर आहे, तरीही पक्षी उडतातच; १६८
तसे आम्हीही उद्योग करीत राहूं
असें कर. (ऋ. मं. ९ सू. १०७)
हे पवमान सोमांनो, लोकधुरीण राजा
प्रमाणें तुम्ही आमच्याकडे वळा. (ऋ. मं. ९ सू. १०८)
इंद्रानें दिव्यलोक आणि आर्यत्वाचें
तेज ह्या दोहोंचाही लाभ मनुष्याला
करून दिला आहे. (ऋ. मं. १० सू. ४३)
दिव्य यज्ञ संपादक हेच आमचे आर्य
पुरोहित; मीही सद्धर्माचाच मार्ग
नीतीच्या योग्य रीतीनें अनुसरत आहे.
(ऋ. मं. १० सू. ६६)

१५५

इन्द्राचा लाडका
हा वृषाकपि म्हणजे आर्य लोकांचें
अभिवृद्धिकारक धनच नव्हे नाहीं
काय ? (हाच वृषाकपि पौराणिक मारुती आहे) (ऋ. मं. १० सू. ८६) —

हे अग्नि, तूं असा आहेस कीं तुझा
वर्ण प्रत्येक दिवशीं धाउस उत्पन्न
करतो, आणि तूं धर्मव्यवस्था उद्ध्वस्त
करणाऱ्या राक्षसांना ठार करितोस -
(ऋ. मं. १० सू. ८७)

जे दानशाली असतात, ते मद्याच्या
अगदीं आंतल्या आनंदाचें पेय अर्थात्
मद्यापेक्षां उत्कृष्ट असें पेय जें अमृत
तें जिंकून प्राशन करितात. (ऋ. मं. १० सू. १०७)

इन्द्रानें वृत्राला ठार मारतांच जगावरील
निबिड अंधःकार तत्काळ नाहीसा झाला -
(ऋ. मं. १० सू. ११३)

१६८

वरुणानें दिव्योदकांना सहजच भूलोकीं ओतून दिले. (ऋ. मं. १० सू. १२४)
मानवी अजाजन जसे राजाला पसंत करतात, त्या प्रमाणें आपो देवींनी इंद्राला पसंत केलें, कारण त्यांना वृत्राचा तिरस्कारा आलाच होता, आणि त्या त्याच्या पासून दूरच राहिल्या होत्या. (ऋ. मं. १० सू. १२५).
सर्वांचा पराभव करणारा असा जो विजयी वीर तो मी - सर्व कांहीं घडवून आणणाऱ्या अशा माझ्या अंगच्या तेजस्वी सामर्थ्यानें मी आलों आहे; आणि तुमच्या शरीरावरच केवळ

नव्हे, तर तुमचे विचार, तुमच्या कार्यपध्दती, आणि तुमचे समाज ह्यां सर्वांवर मी आपला पगडा आतां कायम बसविला आहे. तुमचें सर्व वित्त आणि जीवित माझ्याचं हातीं आहे, आणि तें स्वाधीन ठेवूनच मी माझें स्थान अत्युच्च ठेवूं शकेन. ~~असें~~ असंगीं तुमच्या डोक्यावरही मला पाय द्यावा लागेल, पाण्यांतील बेडुक जसें केंकारतात, पाण्यांतुनच ते जसे रेंकतात, त्याप्रमाणें माझ्याच्या आश्रयाखालीं केंकारण्याची पाळी तुम्हांवर येईल, म्हणून संभाळून वागा.

(अ. मं. १० सू. १६६)

१६६

आर्यांनो अग्नीने तुम्हांला इच्छित वस्तु द्यावी म्हणुन तुम्हीही एकत्र होऊनच कार्य करा. परस्पर विचार विनिमय करण्या साठीं संवाद करीत जा. पूर्वी देव ज्या प्रमाणें यज्ञ मंदिरांत एकत्र होऊनच हविर्भागांचा स्वीकार करीत असत, त्या प्रमाणें तुम्हीही एकत्र बसून एकमेकांचे विचार समजावून घ्या. तुम्हां सर्व आर्यांचा मंत्र म्हणजे मनांतील उद्देश एकच असूंद्या. तुमची ~~समि~~ति म्हणजे सभा ही सर्वांची एकाच मार्गें करीत जा. त्या योगाने तुमचें मन आणी तुमचें चित्त ( ~~[illegible]~~ विचारानें

१७८

ठरविलेली गोष्ट ) हे ही एकसारखेच रहातील. तुम्हां सर्वांसाठी मी आतां एकच मंत्र ( ऋक् केली ) सांगतो, आणि सर्वांचा मिळून एकच हविर्भाग अग्नीला अर्पण करतो. ती तत्त्वाची गोष्ट ही कीं " तुमचा विचार आणि योजना एकच असूंद्या; तुमची अंतःकरणें एकसारखी - एकाच भावनेनें परिपूर्ण असूंद्या. तसेंच तुमचें मनहि सारखें - एकाच ध्येयाकडे लागलेलें असूं द्या. म्हणजे तुम्हाला पाहिजे असेल ती गोष्ट सहज साध्य होईल. ( ऋ. मं १० सू. १९१ )

१५८

१६०

हा पडदा प्रेमळ उषेच्या अव्यय व जोडून तयार झाला आहे. त्याच्या भोंवतीं हा नाश रहित तेजःपुंज तारागण कसा चमकत आहे. काळ्याभोर अंधःकारांतून ही थोर स्वामिनी श्री प्रकट झाली त्यांत तिचा हेतु मनुष्यांच्या निवासस्थानावर प्रकाश पाडुन अनुग्रह करावा इतकाच आहे. आतां सत्यपूर्ण हृदयंगम स्तवनें गाण्यास प्रारंभ होवूं द्या. कविप्रतिभा हि प्रकट होवूं द्या. वेदीवरील अग्नि प्रदीप्त झाला आहे, आणि जगांतील आल्हाद कारक संपत्ति श्री आतां पर्यंत अंधःकारांत

गडप झालेली होती, तिला उषेनें आमच्या दृष्टीस पुनः पाडिलें आहे.



बाष्प आणि धुकें यांनी भरून गेलेल्या पूर्वेकडील आकाशांत या उषेने आपला ध्वज रोवून दिला आहे! पहा कसा आपला ध्वज रोवून दिला आहे! त्याची प्रभा इतकी फांकते कीं आपल्या आई बापांच्या, ज्या क्षितिजरूपी अंकावर ही उषा बसत असते तें क्षितिजच तिनें प्रकाशानें चमकदार भरून टाकलें आहे.

(ऋ. मं. १ १२३-१२४)

हीं जी नक्षत्रें आकाशांत चमकत आहेत तीं अनुचरांप्रमाणें आपल्या तेजःपुंज प्रभूच्या योजनेंत गढून गेलीं आहेत, आणि परिचारकगण त्याच्या रथाला अगदीं —

एकसारखे मनाला आल्हादकारक असे
अश्व जोडीत आहेत. अहाहा ! अचेतनास
चैतन्य देऊन आणि जें आकार रहित
होतें तें आकारास आणून तूं उघेसह
प्रकट झालास. (भद्र. पै. १-६)

१६२

~~अद्भुत भक्तीचें~~
~~कर्णिक आविष्कार~~
~~पै. ५-५४~~

यजु.

हे पलाशशाखे, पर्जन्यवृष्टीकरितां आम्हीं करीत असलेल्या यज्ञकर्मांत तुझा उपयोग व्हावा म्हणून मी तुला तोडतो. (यजु. अ. १ कंडिका १ मंत्र १)

हे विष्णो, हवनीय अशा या दुधाचें तूं रक्षण कर. (यजु. अ. १ कं. ४) मी असत्याला दूर करुन या सत्याच्या जवळ आलों आहें, अर्थात यज्ञकर्म पद्धतें मी अकल्प भाषण केव्हांही करणार नाहीं. (यजु. अ. १ कं. ५) हे अग्ने, तूं हिंसक आहेस. पातकी अशा हिंसकाला तूं ठार कर. जो आम्हांला

163

मारण्याच्या स्वरुपरीतं असेल ; अथवा ज्याला मारण्याची आम्ही स्वरुप करीत आहों त्याला तूं ठार करि. (यजु. अ. १ कं. ६)

हे अग्न्य, तूं मूर्तिमंत तेज आहेस, कांतिमान आहेस व विनाश रहित आहेस. तूं आनंदाचें मंदिर घर आहेस. देवांना तूं प्रिय आहेस (यजु. अ. १ कं. ३१)

हे अग्ने, तूं अन्नाला जिंकणारा आहेस (यजु. अ. २ कं. ७) हे इन्द्रा, मला अपेक्षीत असलेली कार्यक्षम अशी इंद्रियशक्ति मला असो. (यजु. अ. २ कं. १०)

हे वेद, तूं ज्ञाता आहेस. हे वेद देवा, ज्या कारणास्तव तूं देवांना ज्ञानप्रद झालास

त्याच कारणास्तव तूं मला ज्ञानप्रद हो.
(यजु. अ. २ कं. २१). हे सूर्या, तूं 165
स्वयंसिद्ध व सर्वांत श्रेष्ठ असा हिरण्यगर्भ
नांवाचा तेजः किरण आहेस. ज्या अर्थी
तूं तेज देणारा आहेस त्या अर्थी तूं
मला ब्रह्मवर्चस् नामक तेज दे. (यजु. अ. कं. २।२६)
हे उदक, तूं अन्नांतील सारभूत रस,
रूपांतील सारभूत अंश, दुधांतील
सारभूत रस व नाना प्रकारच्या फुलां
मधून गळणारा मकरंद धारण करणारें
आहेस., आणि त्यामुळेंच तूं सर्व
रोगनिवारक, अपमृत्युविनाशक व
सर्वबाधा निवारक असें आहेस. (यजु.
अ. २ कं. ३४)

१८६

या अग्नीची देदीप्यमान अशी वायुरूप
शक्ति आणि प्राण्यांच्या शरीरांत श्वासो
च्छ्वास उत्पन्न करून द्युलोक व पृथ्वी
यांच्या मध्यें संचार करते. (यजु. अ. ३ कं. ६)
अग्नि हाच ब्रह्मरूपी ज्योति असून
ब्रह्मरूपी ज्योति हीच अग्नि आहे.
(य. अ. ३ कं. ९) ब्रह्म ज्योति म्हणजे सूर्य.
(य. अ. ३ कं. ९) अग्नि धान्याची
अभिवृद्धि करतो. (यजु. अ. ३ कं. १२)
अग्नि स्वभावतःच शरीराचा संरक्षक
आहे. (यजु. अ. ३ कं. १७) हे रुद्रा, सर्व
उपद्रवांचें निवारण करणारे तूं जणों
काय औषधच आहेस. (यजु. अ. ३ कं. ५९)

हे दुग्धरूपी उदकांनो, मी तुमचें पान केल्यानंतर तुम्ही सत्वर पचून जाणारी व्हां. माझ्या उदरामध्यें सुख उत्पन्न करणारीं व्हा. अबलरोगरहित, सामान्य रोग निवर्तक, निरपराध, यज्ञकर्म विवर्धक, दीप्तिमान आणि मरणधर्म राहित अशीं हीं उदकें आमच्या करितां माधुर्ययुक्त होवोत. (यजु. अ. ४ कं. १२). ज्याने पृथ्वीवरील रजःकणांची मोजणी केली, ज्याने अत्यंत उंचावर असणारें देवांचें द्युलोकरूप निवासस्थान खाली पडूं न देतां वरच्यावर थोपवून धरिलें, जो अग्नि, वायु व सूर्य यांच्या

रूपाने पृथ्वी, अंतरिक्ष व द्युलोक
या तिन्ही लोकांवर पावलें टाकून
चालला आणि महात्म्यांनी ज्याचे गुण
गायिले आहेत अशा त्या विष्णूचे
कोणकोणते अद्भुत पराक्रम मी वर्णन
करावे. (यजु. अ. ५ कं. १८).

विद्वान् लोक निरावरण आकाशांत
आप्त झालेलें आणि मित्र, वरुण, व
अग्नि यांचें जणों काय नेत्रेंद्रियच असें
तें भगवान् विष्णूचें परमश्रेष्ठ -
आदित्यमंडलात्मक स्वरूप सर्वदा
पाहतात. (यजु. अ. ६ कं. ५)

हे आदित्या, प्राणिमात्रांवर उपकार
करण्याचे कामीं तूं केव्हांही आळस करीत
नाहीस. प्रत्येक प्राण्याच्या चालू व
पुढील अशा दोन्ही जन्मांत त्यांचे
तूं अत्यंत प्रेमानें पालन करतोस.
(यजु. अ. ८ कं. ३). हे गाईनो,
तुमची प्रीति आम्हां यजमानांच्या
ठिकाणीं असो. तुम्ही आम्हां यजमा-
नांच्या सान्निध्य आनंदानें रममाण व्हा.
तुम्हांला ~~[illegible]~~ आम्हां यजमानांच्या विषयीं
सर्वदा संतोष असो. तुमचा स्वकीय असा
परिवार देखील आम्हां यजमानांच्या
ठिकाणीं संतुष्ट होवो. ही आहुति

गो देवतांना समर्पण असो .(य. अ. ८ कं. ५१)

१६०

सोम वनस्पतीला निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या संज्ञा म्हणजे नांवें देण्यांत येतात. तीं अशीं:- (यजु. अ. ८ कं. ५४ पर्यंत ५८)

| संस्कार | नांव (सोमाचें). |
|---|---|
| १ यजमाना कडुन मनःपूर्वक संकल्पित होतो तेव्हां | १ परमेष्ठि. |
| २ यजमान सोमयाग करीतो असें म्हणतो तेव्हां | २ प्रजापति. |
| ३ यजमाना समोर येतो तेव्हां | ३ अंध |
| ४ विभागणी झाल्यावर | ४ सविता. |
| ५ दीक्षणीयेष्टि झाल्यावर | ५ विश्वकर्मा |

१२

६. सोम विकत घेण्यासाठी
सोम क्रयणी गांवाची
गाय यज्ञमंडपांत असताना तेव्हा. ६ पूषा.

७ विकत घेण्यासाठी जवळ आलेला . . ७ इंद्र व मरुत्

८ विकत घेण्याचें काम चालू असतां . . ८ असुर

९ विकत घेतल्यानंतर - - - - - ९ मित्र.

१० यज्ञपात्राच्या मांडीवर असतां . . १० विष्णु.

११ रथांत घालुन यज्ञशालेकडे चालविलेला . . ११ विष्णु.

१२ रथांतुन उतरून घेतलेला - - - १२ सोम.

१३ यज्ञशाळेंत घडवंचीवर ठेवलेला . . १३ वरुण.

१४ अग्नीध्र नामक शाळेंत ठेवलेला . . १४ अग्नि.

१५ हविर्धान मंडपांत आणलेला . . १५ इन्द्र

१६ कुटण्यासाठीं जवळ आणलेला . . १६ अथर्व.

१७ चोथा झालेला निरुपयोगी . . . १७ विश्वेदेव.

१८ पाणी शिंपडुन पुष्ट केलेला . . . १८ विष्णु.

१९ कुरला जात असलेला . . . १९ यम.

२० कुटून व्यवस्थित ठेवलेला . . २० विष्णु.

२१ दशापवित्र नामक लोकरीच्या गाळण्यांतुन गाळला जात असतां . . २१ वायु.

22 गाळल्यानंतर . . . . . . 22 शुक्र.

23 दुधाशी मिश्रित केला . . . . 23 शुक्र.

२४ सातूचें पीठ त्यांत मिळविलें की . . २४ पंथी.

२५ "चयस" नामक लांकडी पात्र्यांत भरलेला . . . . . . . . २५ विश्वेदेव

२६ होमासाठीं उचलुन घेतलेला . . २६ असु.

२७ हवन केलें जात असतां . . . २७ रुद्र.

१३

26 हवन करणारे उद्गात्रा स्तोत्र. ~~ऋत साद~~.

२७ 'साद' नामक मंडपांत परत आणला की . . . . 26 वायु.

२८ भक्षणासाठी एकमेकांनी अनुज्ञा विचारली की . . . २८ नृचक्षाः

30 भक्षण करतांना - . . . 30 भक्ष.

31 त्याची उत्पत्ति देवली की तिला चिकटलेला - . . 31 नाराशंसपितर.

32 अवभृथासाठी सज्ज केलेला . . 32 सिंधु

33 पाण्याकडे नेला जात असतां . . 33 समुद्र.

34 तो पाण्यांत टाकला की तो . . 34 सलिल

या प्रमाणें एका सोम ~~[illegible]~~ वल्लीचीच हीं निरनिराळी नांवें आहेत.

स्वभावत:च यज्ञाचा विस्तार करणारे १८८
'परमेष्ठी' इत्यादि चौतीस देव आहेत.
(यजु. अ. ८ कं. ५९). अन्नाला पवित्र करणारा
सूर्यमंडलरूप देव आमचें अन्न पवित्र करो.
(यजु. अ. ९ कं. १). अन्नाचा उत्पादक,
सूर्याच्या ठिकाणीं स्थिर होऊन राहिलेला
व उदकांचा सारभूत रस अशा वायूला
मी ग्रहण करतों. (यजु. ९ कं. ३) हे
ग्रहांनो तुम्ही एकमेकांपासुन अलग झालेले
आहांत. यासाठीं तुम्ही ~~[illegible]~~ मला
पातकी मनोवृत्तीपासुन अलग करा.
(यजु. अ. ९ कं. ४)

हे रुद्रा, 'कल्याणकर्ता' असें तुझें जें दुसरें नांव आहे, तें खरोखर परम उत्कृष्ट आहे. (यजु. अ. १० कं. २०)

ब्रह्मभावापासून च्युत झालेला जीव नाश पावलो. (यजु. अ. १० कं. २१)

प्राणीमात्राला प्रेरणा करणारा सूर्य, वाग्देवता सरस्वती, सर्व प्राण्यांची स्वरूपें निर्माण करणारा त्वष्टा, पशुसमुदायांसह असणारा पूषा, स्वतःच्या इंद्रियशक्तीनें संपन्न असणारा इंद्र, देवांच्या यज्ञांत 'ब्रह्मा' होणारा बृहस्पति, बलिष्ठ असा वरुण, तेजस्वी अग्नि, अत्यंत शोभिवंत।

१८६

असा चंद्र आणि दष्टांची संख्या पूर्ण करणारा यज्ञाधिदेव भगवान् विष्णु यांच्या आज्ञेनें मी प्रेरित झालो आहे. (यजु.अ.१० कं.३०). सर्व ठिकाणीं प्रत्यगात्मरूपानें रहात असलेल्या अग्नीला मी घृतानें सिंचित करतों. (यजु. अ. ११कं. २४) हे यज्ञनिर्वाहका, अग्निदेवा, उठून उभा रहा व दैवी बुध्दीनें आमचें संरक्षण कर. (यजु. अ. ११ कं. ४१) हे अन्नपालका, अग्निदेवा. आम्हांला रोगजंतूंनी रहित व बलप्रद अशा अन्नाचा भरपूर अंश मिळवून दे. (यजु. अ. ११ कं. ८३)

१८७

हे अग्ने, माझें उपास्य दैवत असून
मीं तुला बोलावून आणलें आहे.
पृथ्वीरूप असा या उखेच्या मध्यभागीं
आतां तुझें वास्तव्य झालें आहे. हे अग्नी
देवा सर्व लोक तुझ्या उपासनेची इच्छा
करीत आणि तुझ्या कृपाछत्राखालीं
असलेलें आमचें राष्ट्र वैभवापासून
केव्हांही भ्रष्ट न होवो. (यजु. अं. १२ कं. ११)

हे वरुणा, आमच्या गळ्याशीं जखडलेला
तुझा फांस वरच्यावर काढून घे;
त्याच प्रमाणें आमच्या दोन्ही पायांना
घट्ट बसलेला तुझा पाश सैल करून
तो खालच्या खालींच सोडून टाक व
आमच्या कमरेभोंवतीं घट्ट आंवळलेला

फांसाडि तूं तोडुन टाक. (यजु. अ. १२ कं. १२)

हे अग्ने तुझें पूजन करण्यांत गढून
गेलेल्या गृहस्थांनीं दिवसानुदिवस
स्पृहणीय अशीं सर्व प्रकारचीं धनें
संपादन केलीं आहेत आणि तुझ्या
सान्निध्यांत राहून यज्ञ फलाची इच्छा
करणाऱ्या सुज्ञ व यज्ञकुशल यजमानांनीं
गाई-वासरांनीं गजबजलेली व विस्तीर्ण
अशी गोशाला आपलीशी केली आहे.
(यजु. अ. १२ कं. २८) हे ओषधींनो, तुमची
'इष्कृति' नामक माता, स्वभावतःच
रोग निवारक आहे. (यजु. अ. १२ कं. ८३)

आज असलेल्या व पुढें उत्पन्न
होणाऱ्या सर्व मनुष्यांचे मनोरथ
पूर्ण करणारा, जगीं अद्वितीय
चक्रवर्ती राजाच असा अग्निदेव,
आपल्याला प्रिय असणाऱ्या अनेक
ठिकाणीं विराजमान होत असतो (अ. अं. १२ क्रं. ११८)
चैत्र व वैशाख हे दोन महिने वसंत
ऋतूचे अवयव होत. (यजु. अं. १३ क्रं. २५)
आमच्या साठीं प्रत्येक वनस्पति मधुर
रसानें युक्त असो, सूर्य आल्हादजनक
असो। आमच्या गाई मधुर अशा
दुधानें संपन्न होवोत. (यजु. अं. १३ क्रं. २९)

१८०

हे कूर्मा, उदकांचें गंभीर वसतिस्थान असलेल्या सूर्यमंडळाचे ठिकाणीं तूं बैस. (यजु. अ. १३ कं. ३०) ज्यांच्या योगानें जगांतील सर्व प्राण्यांचे व्यवहार बांधून टाकले गेले, ती विष्णूची अद्भुत कर्में तुम्ही अवलोकन करा. तो इंद्राचा जिवलग मित्र आहे. (यजु. अं. कं.)
१३ ३३

जंगम व स्थावर अशा सर्व वस्तूंच्या अंतर्यामी सूर्य आत्मस्वरूपानें रहातो (यजु. अं. कं.). ज्येष्ठ व आषाढ हे
१३ ४६

दोन महिने ग्रीष्म ऋतूचे दोन अवयव होत. (यजु. अं. कं.)
१४

श्रावण व भाद्रपद हे दोन महिने
म्हणजे ज्यांत वर्षा ऋतूचे दोन अवयव
होत. (य. अं. कं.) आश्विन व कार्तिक
१४ १५
हे दोन महिने ज्यांत शरद् ऋतूचे दोन
अवयव होत. (य. अं. कं.). मार्गशीर्ष
१४ १६
व पौष हे दोन महिने म्हणजे ज्यांत
हेमंत ऋतूचे दोन अवयव होत. (य. अं. कं.)
१४ २८
क्रोधरहित व सर्वभक्षक असे दोन
घोडे आणि आपल्या रथाला जोडतो.
(य. अं. कं.). माघ व फाल्गुन हे दोन
१४ ३३
महिने ज्यांत शिशिर ऋतूचे अवयव
आहेत. (यजु. अं. कं.).
१५ ५८

वेदांमधील सर्व स्तुतिवचनें इंद्राला १९२
कीर्ति कायानें वाढवीत असतात. (य. अ. कं. १५ ६१)
प्रगल्भ स्वभावाच्या रुद्राला नमस्कार
असो. (य. अ. कं. १६ ३६). यजुर्वेदाचा १६वाव
१६वा अध्याय हे रुद्राध्याय आहेत.
जे उत्कृष्ट जाणते असे वैदिक असतात,
ते सर्व जगाच्या धारणपोषणाला
कारणीभूत असा यज्ञ करतात. (य. अ. कं. १७ ७८)
सविता देवाच्या प्रेरणेनें, आश्विनी
कुमारांच्या बाहूंनीं, पूषा देवाच्या हातानीं,
सरस्वतीच्या वाणीनें, जगांच्या
प्रजापतीच्या नियंत्रणानें आणि अग्नीच्या
साम्राज्यानें मी तुला अभिषेक करतों.
(य. अ. कं. १८ ३०)

अक्षर! - अक्षरांचे तीन संघ मिळून संख्येनें तेहतीस देव आहेत. (य. अ. २० कं. ११).

१८३

ॐ हें परब्रह्माचें नांव आहे. (यजु. अ. ४० कं. १८ ईशावास्योपनिषत्)

देदीप्यमान आणि जगत्कर्त्ता अशा 'नराशंस' नामक यज्ञपुरुषानें इंद्राला मरणरहित असा उत्कृष्ट जन्म दिला. (यजु. अ. २९ कं. ५४).

सविता देव सर्वांना चेतना देणारा, देदीप्यमान आणि शान्तींचें विश्रामस्थान आहे. (यजु. अ. २२ कं. १०). ब्रह्म हें सूर्याप्रमाणें प्रकाशमान आहे. द्युलोक हाच जणों समुद्रासारखें विस्तीर्ण सरोवर आहे. इंद्र हाच पृथ्वीवर अत्यंत श्रेष्ठ आहे. आणि वाग्देवतेच्या शब्दकोशाचें मापच करतां येत नाहीं. (यजु. अ. २३ कं. ४८)

१५४

परमेश्वराची माया हीच स्वतःचे जगद्रूपी स्वरूप निर्माण करणारी होय (यजु. अ. कं. २३ ५८)

१९५

महात्म्या सूर्याचा जन्म परब्रह्मापासून झाला आहे. चंद्रहि त्यापासूनच उत्पन्न झाला आहे. (यजु. अ. कं. २३ ६०).—

यज्ञच परमात्म्याचें वसतिस्थान आहे. (यजु. अ. कं. २३ ६२). या जगाच्या मध्यभागीं राहून आपल्या भोंवतीं विस्तारलेल्या ग्रहमंडळाला आपल्या किरणांच्या द्वारां आकर्षित करणें व आपल्या कक्षेंत नियमितपणें राखणें हेंच सूर्याचें देवपण व हेंच त्याचें महत्व आहे. (यजु. अ. ३३ कं. ३८)

हे वनस्पते,
तुझ्या शरीरांतील मज्जांशीं या तुटलेल्या मज्जा, व अवयवांशीं तुटलेला अवयव जोडला जावो. शरीरांतील नाहींसें झालेलें मांस व मोडलेलें हाड पुन्हां वाढो. कां. सू.
(अथर्व. ४-१२)

अशी प्रमाणें खरखरीत उष्णतेनें जाळून, तूं विश्वलोकांला पिंवळे करून सोडतोस; लेव्हां हे तक्मन् (ताप; ज्वर.) तूं दुर्बल व निस्तेज हो. अधरात जा किंवा येथून नाहींसा हो. (अथर्व. ५-२२) कांड. सूक्त.

आँतड्यांत, डोक्यांत व पार्ष्णींत असणारे कृमी, आंत शिरणारे कृमी व अनेकमार्गकरून आंत शिरणारे कृमी या सर्वांना मी मंत्राच्या योगानें मारून टाकतो.
(अथर्व. २-३१) कांड सूक्त.

हे धनपते इंद्रा! या मुलाच्या अंगांवरील

कृमींना मारून टाक. माझ्या उग्र मंत्राच्या

योगानें सर्व शत्रू मारले गेले- (अथर्व. कां. ५ सू. २३)

ज्या ज्या गावांमध्यें माझ्या मंत्रसामर्थ्यांचा

प्रादुर्भाव होतो तेथून पिशाच्चें पार पळून

जातात, व लोकांना मुळींच त्रास होत नाहीं.

(अथर्व. कां. ४ सू. ३६) सर्व दिशांकडून वाऱ्याच्या

योगानें पर्जन्यमेघ एकत्र जमोत. माजलेल्या

बैलाप्रमाणें गर्जना करणाऱ्या मेघांपासून

पृथ्वीवर भरपूर पर्जन्यवृष्टि होवो. (अथर्व कां. ४ सू. १५)

उच्छुद (कामदेव) तुला व्यथित करो. तुला अंथरुणावर स्वस्थ पडवणार नाहीं. कामाचा बाण भयंकर आहे, त्या बाणानें मी तुझें हृदय-विद्ध करतें. (अथर्व. कां. ३ सू. २५)



पुन्हां त्याचें चेंडुक हातीं धरून त्या चेटक्या कडे परतल्या, व तें त्याच्या डोळ्यांसमोर अशा रीतीनें ठेवा कीं, तें त्याला मारील. (अथर्व. कां. ५ सू. १४)

वरुण रोग पाठवून देतो व नाहींसे करतो; वरुण संदेश्य आहे व विदेश्यहि आहे; वरुण दैवी व मानुषी आहे. (अथर्व कां. ४ सू. १६)

— o —

१९९

१२ कांहीं वैदिक दैवतांची
वर्णनें व कथानकें.

२९ वेदांतील कांहीं वैदिक देवतांची वर्णनें

अग्नि:- हा ब्रह्मदेवाचा मानसपुत्र होय.
ब्रह्मदेवाच्या कोपापासून याची उत्पत्ति
झाली. ((पौराणिक):- किंत्येक स्थळीं धर्म व वसु यांचा
हा पुत्र होय असें सांगितलें आहे.
याची पत्नी वसोर्धारा होय.) दक्षप्रजा
पतीची स्वाहा नामक जी कन्या ती
याची पत्नी होय. याची दुसरी स्त्री
इक्ष्वाकुवंशांतील दुर्योधन राजाची
कन्या जी सुदर्शना ती होय. प्रथम
स्त्री जी स्वाहा ती किंत्येकांच्या मतें
माहिष्मती नगरीचा राजा जो नीलध्वज
याची कन्या होती. नीलध्वजानें आपली

200

कन्या अग्नीला देते वेळीं असा करार
केला होता कीं अग्नीनें नेहमीं नीलध्वजाच्या
नगरींतच राहावें व जो कोणी शत्रु 209
माहिष्मतीवर चालून येईल त्याचें
सैन्य जाळून टाकावें. या करारानें बांधला
गेल्यानें अग्नि आपल्या सासऱ्याच्या
येथें घरजांवई होऊन राहिला. पुढें
जेव्हां अर्जुनाच्या सैन्याशीं नीलध्वजाला
लढावें लागलें, त्या वेळीं अग्नीनें अर्जुनाचें
सैन्य जाळलें. सप्तर्षींचें हविर्द्रव्य देवांना
अर्पण करून अग्नि परत चालला असतां
सप्तर्षींच्या स्त्रिया त्याच्या दृष्टीस पडल्या.
तेव्हां त्यांच्या विषयीं त्याला कामवासना उत्पन्न
झाली. अग्नि हा गार्हपत्यामध्यें प्रविष्ट

होऊन चिरकाल त्यांच्या जवळ राहिला. 202
परंतु त्या वरान झाल्यामुळें हा अत्यंत
निराश झाला व देहत्यागाचा निश्चय
करून आरण्यांत गेला. त्या स्त्रियां पैकीं
दक्षकन्या स्वाहा हिची मात्र याजवर
प्रीति जडल्यामुळें ती याच्या मागें वनांत
गेली; व तिनें इतर सप्तर्षींच्या स्त्रियांची
रूपें धारण करून तिनें एकटीनेंच याची
इच्छा पूर्ण केली. मात्र ती अरुंधतीचें रूप
घेऊं शकली नाहीं. ~~(पौराणिक)~~ पूर्वी श्वेतकी राजानें
अपरिमित यज्ञ केले व त्या यज्ञांतील
तूप पिऊन अग्नीच्या जठराग्नीला
मंदत्व आलें झालें व आगे कृश बनला-

(अग्नि) आपले अंगी मांद्य दूर करण्या साठीं औषधी
मिळावी म्हणुन ब्रह्मदेवाच्या सांगण्या
वरून श्रीकृष्ण व अर्जुन यांच्या कडे गेला
व खांडववनांतल्या औषधी देवविण्या
साठीं त्याने कृष्णार्जुनांची विनवणी
केली. खांडववनाचें रक्षण स्वत: इंद्र
करीत असे. कृष्णार्जुनांनी आपल्याला
युद्धसामुग्री पुरी पाडल्यास खांडववन
तुला इंद्रापासून देववूं असें कबूल केल्या
वरून अग्निनें कृष्णार्जुनांना कपिध्वज
युक्त असा एक दिव्यरथ, गांडीव नावाचें
धनुष्य, अक्षय्य बाणांचे दोन भाते,

अर्जुनाला दिले व कौमोदकीनांवाची गदा आणी सुदर्शनचक्र हीं कृष्णाला दिलीं. नंतर कृष्णार्जुनांच्या आज्ञेने एकवीस दिवस पर्यंत तें खांडववन अग्नी भक्षण करीत होता व कृष्णार्जुन इंद्राचें निवारण व अग्नीचें रक्षण करीत होते.

सीतेला लंकेहून परत आणल्यावर राम तिचा स्वीकार करीना त्यावेळीं सीता पवित्र असल्याबद्दल अग्नीनेंच खात्री करविली ~~ ~~ होती.

विद्यापीठ कार्यालय ... ... ...

अर्यमन :-

204

मित्रा वरुणां बरोबर याचा उल्लेख येतो. आदित्य व मित्र यांच्या प्रमाणें हा इतर देवतांचा स्नेही आहे. याचा उल्लेख संस्कारांत येतो. इतर देवांप्रमाणें हा हि कश्यप व आदिति यांचाच पुत्र आहे. हा बारा आदित्यांपैकीं एक आहे तसेंच हा पितृगणांतिलाहि एक आहे. हा वैशाखांत प्रकाशतो. याची 300 किरणें आहेत.

२०९

अदिति :-

ही मित्रावरुणांची व अर्यम्याची माता असल्यामुळें हिला राजमाता म्हणत असत. तिचे आठ मुलगे अत्यंत बलवान होते असें ऋग्वेदांत वर्णन आहे. आदितीला ~~[illegible]~~ द्यौ व पृथ्वी यांच्याशीं एकरूप केलेलें आहे. यांच्या आदिती, आप आणि पृथ्वी यांच्या पासून देव उत्पन्न झाले. एके ठिकाणी तर आदिती ही विश्वसृष्टीची मूर्ति असल्याचें वर्णन आहे. कित्येक ठिकाणीं तिला 'गो' म्हटलें आहे. ~~[illegible]~~

ही दक्ष प्रजापति व असिक्नि
यांची कन्या आणि कश्यप प्रजापतीची
स्त्री आहे. मैनाक पर्वताचे पायथ्यावर
असलेल्या 'विनशन' नामक तीर्थावर
अदितीनें यज्ञ केलेला होता.
अदितीने चरु शिजविला होता.
इंद्राला जिंकणारा पुत्र प्राप्त व्हावा
त्या वेळी हिने पुत्रप्राप्त्यर्थ (केलेल्या
तप व उग्र राहून अतिशय कडक तप
केले होते व त्यामुळे विष्णूचा गर्भ
हिच्या उदरी आला. विष्णूचे अगोदर
हिला अकरा पुत्र झाले होते. विष्णू हा
हिचा बारावा पुत्र होता. (केत्येक ठिकाणी
हिचे आठच पुत्र दिले आहेत). इंद्र
पुत्र नरकासुराने अदितीची कुंडले

हरण करून तो प्राग्ज्योतिष पुरांत गेला त्याला कृष्णाने जिंकून त्याजपासून ती कुंडलें परत आणून अदितीस दिली.

२०८

आश्विनीकुमार:-

या एकाच नांवाने ओळखल्या जाणाऱ्या द्युस्थानीय दोन देवता आहेत. हे जुळे भाऊ असून यांची जोडी कधीही फुटत नाही. हे जुळे भाऊ सरण्यू पासून पहाटे उत्पन्न झाले. यांची उगवण्याची वेळ उषा व सूर्योदय यांच्या दरम्यान आहे. यांचा रथ श्येन, गरुड व हंस पक्षी ओढतात.

यांचा रथ एका दिवसांत पृथ्वी परिक्रमा
आक्रमितो. सूर्यकन्या सूर्येचे हे पति होत.
हे लोकांना संकटमुक्त करतात. वृद्धांनां
तरुण बनवितात. हे रोग बरे करणारे
आहेत. हे देवांचे धन्वंतरि व मृत्यूला
टाळणारे आहेत.                                                                209

पुराणांत हे विवस्वानाला संज्ञेचे
ठायीं, ती अश्व रूपानें संचार करीत
असतां, तिच्या नाकांतून उत्पन्न झालेले
पुत्र आहेत असें वर्णन येतें. व त्या
मुळें यांना 'नासत्य दस्त्रौ' असें म्हणतात.
यांनीं च्यवन महर्षीला तरुण केलें. माद्रीला
यांच्यापासून नकुल व सहदेव हे दोन

पुत्र झाले. हे शिरस्थार चक्राच्या स्तनावर आहेत.



आदित्य:—

हे वैवस्वत मन्वंतरांतील देवतासमूहाचें नांव आहे. आदित्य बारा असून ते बारा महिन्यांचे निदर्शक आहेत. यां सर्वांत विष्णु हा सर्वश्रेष्ठ मानतात. सूर्य हा सातवा व मार्तंड हा आठवा आहे. गाय ही आदित्याची बहिण आहे. इंद्र हा अदितीचा पुत्र असून आदित्यां पैकींच एक आहे. बारा आदित्य व त्यांचे महिने पुढील प्रमाणें आहेत. —

आदित्य व महिना
अंशुमान — आषाढ.
अर्यमन — वैशाख
इंद्र — आश्विन.
त्वष्टा — फाल्गुन
धातृ — कार्तिक.
पर्जन्य — श्रावण.
पूषन् — पौष.
भग — माघ
मित्र — मार्गशीर्ष.
वरुण — भाद्रपद
विवस्वान् — ज्येष्ठ.

आदित्य व महिना.
१ विष्णु — चैत्र

२११

२९२

ऋभु :-

हे मानव होते. पण तप, यज्ञ वगैरे करून यांनी देवत्व मिळविले. देव यांना आपणांत घेईनात. शेवटी प्रजापतीच्या सांगण्यावरून यांना सूर्यलोकावर सोमपान करण्याचा मान मिळाला. चाक्षुष व वैवस्वत मन्वंतरांत हे देव मानले आहेत.
ऋभुगीता नांवाचा एक २० अध्यायांचा ग्रंथ याच्या नांवानेच प्रसिद्ध आहे.

त्रित आप्त्य :-



अग्नीला उदकापासून एकत,
द्वित व त्रित असे तीन पुत्र झाले.
उदकापासून झाल्या मुळें यांना आप्त्य
हें विशेषण लावतात. लांडग्यांच्या
भयानें त्रित विहिरींत पडला व तेथें
तो देवांचा धांवा करूं लागला. तेव्हां
बृहस्पतीनें त्याची तेथून सुटका केली.
यांचें वरुण आणि सोम यांच्यांशी ऐक्य
असतें. इंद्रानें त्रिता करितां
अर्बुदराक्षसाला ठार केलें. पुराणांत हे गौतम पुत्र म्हणून
प्रसिद्ध आहेत.

२१८

दक्षः-

दक्ष हा अदितीचा मुलगा व अदिति ही दक्षाची मुलगी असा उलट सुलट प्रकार ऋग्वेदांत आढळतो. (ऋ. १०.७२;४-५)
दक्ष प्रजापतीनें प्रजा समृद्धि व्हावी म्हणून दाक्षायण किंवा वासिष्ठय नामक यज्ञ केला. हा ब्रह्मदेवाच्या दक्षिण अंगुष्ठा पासून झाला. स्वायंभुव मनूची मुलगी प्रसूति ती दक्षाची बायको. तिच्या पासुन सोळा मुली झाल्या, सोळावी सती नामक मुलगी शंकरांना दिली. ब्रह्मदेवाच्या उजव्या आंगठ्या

पासून जन्मलेली स्त्री दक्षाचीच बायको होती. तिला ५०० मुली झाल्या. २१५

दिति :-

ही प्राचेतस दक्ष प्रजापति व आसिक्नी यांची कन्या. व कश्यपाची भार्या. हिची पुत्रे दैत्य असून ते देवशत्रु आहेत.

पूषन् :-

रुद्रा प्रमाणें याला जटा व दाढीआहे. याच्या जवळ सोन्याचा भाला आहे. व अंकुश आहे. हा उत्तम सारथि आहे.

याच्या गाडीला बोकड जोडलेले असतात. 295

हा दंतहीन असून पेज किंवा पिठाचे

पक्व पदार्थ खातो. हा एके वेळी सर्व

प्राणी पहातो. हा सर्व चराचराचा

स्वामी आहे. हा मातेची (रात्रीची)

व भगिनीची (उषेची) प्रेमयाचना

करणारा आहे. सूर्या ही याची पत्नी.

हा नववधूंना आशीर्वाद देतो. हा

आपल्या सुवर्ण नौकेंत (~~...~~ विमान)

आकाशांत फिरतो. हा द्यु लोकांत

असून

रहातो. हा मार्गज्ञ असून मृत लोकांना

योग्य स्थळी पोहोंचविणारा आहे.

वारेंत सुरक्षित ते करितां याच्या नांवानें बळी देतात. हा माघ महिन्यांत प्रकाशतो.

बृहस्पति:- हा अंगिरा व सुरूपा यांचा पुत्र-हा एक महर्षि आहे. बृहती म्हणजे वाणी, तिचा पति तो बृहस्पति. याने मोठें तप केलें म्हणूनहि याला बृहस्पति म्हणतात. हा आकाशांत उत्पन्न होतो. हा सत्पुरुष असून राक्षस आहे. धनुष्य, बाण व सुवर्णपरशु हीं याची आयुधें आहेत. याच्या रथाला तांबडे

थोडे असतात. बृहस्पति अत्यंत
पराक्रमी आहे. त्यानें इंद्रास बलाच्या
पराजय करण्याच्या कामीं मदत केली.
त्यानें शत्रूचें दुर्ग फोडले. त्याहि इतं
हा कोणासहि हार जात नव्हता.
बृहस्पति हा अत्यंत परोपकारी आहे,
व त्यामुळें त्याला पिता ही संज्ञा आहे.
बृहस्पतीस ब्रह्मणस्पति, ज्येष्ठराज,
सदसस्पति व गणपति अशीं
दुसरी नांवें आहेत. याची पत्नी धेना.
(वाणी.) याशिवाय तारा व शुभा व जुहू या बायका होत्या.
त्यानें याज्ञवल्क्यास तत्वज्ञान
सांगितलें. याला संवर्त व उतथ्य नांवाचे
दोन भाऊ होते. संवर्ताचें व याचें नेहमीं

वांकडें असे. देवांचा अभ्युदय करण्या साठीं हा शुक्राचार्यांचा वेष घेऊन दैत्यांत त्यांचा गुरु म्हणून राहिला होता. याने धर्मशास्त्र, नीतिशास्त्र व अर्थशास्त्रावर ग्रंथ लिहिले. ब्रह्मदेवाने केलेला विस्तृत ग्रंथ याने संक्षिप्त केला, त्याला बार्हस्पत्यशास्त्र म्हणतात.

भग :-

ही एक ऐश्वर्याची देवता आहे. उषा ही याची बहीण आहे. (म्हणून ऐश्वर्य ही याची बहीण आहे. (म्हणून ऐश्वर्य हवें असल्यास लवकर उठावें). दक्ष

यज्ञांत शंकराने याचे नेत्र फोडले म्हणून हा मित्राच्या नेत्रांनीं पहातो. 220 याची स्त्री सिद्धि. याला तीन पुत्र व एक कन्या होती. हा माघांत प्रकाशतो.

मरुत :-

हा देवतासंघ आहे. रुद्र व पृश्नी यांचा हा पुत्र आहे. यांच्या हातांत धनुष्य, बाण, भाले असतात. हे इंद्राचे मित्र आहेत. यांचा साता सातांचा गट असतो. पुराणांत हे ४९. दाखविलेले आहेत.

सोम :-

सोम हा अत्यंत श्रेष्ठ देव आहे. व त्याच्या वर्णनात्मक अनेक सूक्तें वेदांत आहेत. वास्तविक सोम ही वनस्पति आहे, पण तिच्यां अंगच्या उत्तमोत्तम गुणां मुळेंच तिला देवत्व प्राप्त झालें आहे. दूध, ताक व जव हे सोमांत मिसळीत असत. ही अत्यंत गुणकारी वल्ली मानली आहे. पण ती वल्ली काय आहे याचें चोक्कस ज्ञान हल्लीं नाहीं. याच्या रसाचा वर्ण पिंवळा असतो. सोम प्याल्यानें उत्साह येतो व ताकद वाटते; स्वाभाविक शक्तीच्या पलीकडची कामें हा करवितो. सोमानें सर्व

त्यांना उत्पन्न केल्या आहेत. म्हणून त्यांना 'सौम्य' म्हणतात. पुढें या सोमालाच चंद्र ही संज्ञा मिळाली व हाच वेदकाली मुख्य देव होता. इन्द्र, वरुण हे देव याच्या खालचे मानीत असत इतका याचा दर्जा श्रेष्ठ होता; आणि हें श्रेष्ठत्व या सोम वल्लीला केवळ अंगच्या गुणांमुळेंच प्राप्त झालेलें होतें. त्या वेळचे आर्य गुणांचे भोक्ते होते. रूपावर भुलणारे नव्हते. (हा गुण ग्राहकतेचा गुण सुटून रूपावर भुलण्याची सुरुवात झाली तेव्हांपासूनच आर्यांची अवनति होवूं लागली.)

222

मित्र :-

आर्यलोकांचे संघटन करणारा देव आहे. हा शेतकऱ्यांचा कैवारी आहे. लोकांना हांका मारून हा त्यांना एकत्र करतो. हा नेहमीं वरुणा बरोबर असतो. कारण वरुण हा त्या काळचा सर्वांत श्रेष्ठ देव होता. पूर्वी इंद्रापेक्षांहि वरुणाचा दर्जा श्रेष्ठ होता. मित्र हा शांततांप्रिय देव आहे. पुढे याचा संबंध सूर्याशीं - दिवसाशीं - प्रकाशाशीं दाखविला आहे. व त्याच्या उलट वरुणाचा संबंध रात्रीशीं - अंधःकाराशीं असल्याचें वर्णन आहे.

223

विष्णु:-

ऋग्वेदांत हें दैवत गौणच मानलें आहे. पुढें ब्राह्मण ग्रंथांत याला अत्यंत महत्त्व प्राप्त झालें. तो विराट् स्वरूप असून तीन पावलांत विश्व व्यापून शकतो असें याचें वर्णन आहे. व त्याचा हेतु मानवांना वसतिस्थान मिळावें हा आहे. यज्ञ कर्माचें खरें रहस्य यानें दाखविल्या मुळें हा श्रेष्ठ देव ठरला.

सूर्य:-

हा आकाशांतील पूजार्ह देव आहे. त्याच्या रथाला 'एतश' नांवाचा एक घोडा

आहे. सूर्याचा मार्ग वरुण तयार करतो.
पूषन् हा याचा दूत आहे. द्यौ (आकाश)
हा याचा पिता आहे. तो पूर्वी समुद्रांत
होता त्याला देवांनीं वर काढला. अग्नीनें
सूर्याला आकाशांत चढवयास लाविलें.
धात्यानें सूर्य व चंद्र यांना उत्पन्न केलें.
हा आरोग्य देणारा व आयुष्य वाढविणारा
देव आहे. यानें सर्व आकाश सांवरून
धरिलें आहे. याला उदयापूर्वी सविता म्हणतात.
व उदय पावल्यावर सूर्य म्हणतात.

सविता:-

ही सुवर्णमय देवता आहे. याचें तेज थोर आहे.

याचा सूर्य किरणांशीं संबंध आहे.
सूर्याला प्रकाशीत करणारें हें दैवत आहे. २२५
त्याच्याच योगानें देवांनां अमरत्व व मानवांनां
दीर्घायुष्य प्राप्त होतें. राक्षस व मांत्रिक (दुष्ट)
यांना तो हांकून लावतो. सर्व देव याचें
नेतृत्त्व मान्य करतात. सविता ही सूर्य
देवाची दिव्य शक्ति आहे. ही चैतन्य
निर्माण करणारी देवता आहे. सविता
हा शब्द 'सू' या धातूपासून निघाला
आहे. सू या धातूचा अर्थ उठविणें,
चेतना देणें, उद्दीपित करणें असा आहे.

रुद्र :- या देवतेला ऋग्वेदांत प्राधान्य नाही. रुद्रास एक हात व बाहू असून त्याची गात्रें बळकट आहेत. त्याचा वर्ण पिंगट आहे. त्याची आकृति दैदीप्यमान असून त्याची रूपें अनेक आहेत. त्यानें कातड्याची प्रावरणें परिधान केलेली असतात. तो पर्वतावर रहातो. त्याच्या हातांत तीर व कमठा असतो. हा मरुतांचा पिता आहे. शर्व, भव, शिव हीं याचीच नांवें आहेत. हा राक्षसाशीं लढत नाही. हा शूरांचा अधिपति आहे. हा बुद्धिमान्, परोपकारी व मीढ्व म्हणजे उदार आहे.

वायु :-

वायु ही देवता आहे, व वात हें 226
पंचमहाभूतात्मक एक तत्त्व आहे.
वायु हा त्वष्ट्याचा जांवई आहे. याचा
रथ दैदीप्यमान असून त्याला अरुण
अश्वांची जोडी जुंपलेली असते. सोम
पानाचा पहिला मान याला मिळाला व
नंतर इंद्राला सोमपान करविलें. हा
सोम रक्षक आहे. निर्बल लोकांचें तो
रक्षण करतो. हा आरोग्य व दीर्घायुष्य
देतो.

वरुण :-

वरुण ही देवता इंद्राच्या बरोबरीचीच असून अत्यंत महत्वाची आहे. हा नीतिचा मूर्तिमान पुतळा आहे. त्याचा चेहरा अग्नी सारखा आहे. तो सूर्यामार्फत सर्व जगाला पाहतो कारण सूर्य हा त्याचा नेत्र मानला आहे. त्याला सूर्यनेत्री हेंहि नांव आहे. हा दूरदर्शी व सहस्त्रनेत्री आहे असेंहि यांचें वर्णन आहे. हा कपट प्रयोगांचे निवारण करणारा आहे. हा सोन्याचा झगा धारण करतो व झगझगीत वस्त्रें परिधान करतो. हा आपल्या -

स्वर्गातील निवासस्थानांतून सर्व प्राण्यांच्या सर्व कृत्यांचें अवलोकन करतो. वरुणाचा प्रासाद मोठा, भव्य व हजार स्तंभाचा व हजार द्वारांचा आहे. हा जगताचा राजा आहे, व तो स्वातंत्रि आहे. याच्या दैवी सत्तेला माया हें नांव आहे. हाच ऋतूंचें नियमन करतो. याचें सुवर्णगृह जलामध्यें आहे. याचे कायदे स्थिर आहेत. याला "धृतव्रत" हें विशेषण शोभतें. हा विश्वव्यवस्थेचा पुरस्कर्ता आहे. "ऋतस्य गोपा" म्हणजे "व्यवस्थेचे रक्षितें" हें याचेंहि नांव आहे. हा सर्वज्ञ आहे. समुद्रांतील

व अंतरिक्षांतील मार्ग तो जाणतो. नीतीचा शास्ता म्हणुन हा प्रसिद्ध आहे. हा पाशयुक्त असतो. हा पातकांपासून मुक्त करणारा देव आहे. याला च 'अमृतस्य गोपा' म्हणतात. याचा सूर्याशीं निकट संबंध आहे. यज्ञविकासाच्या कालांत प्रजापति हा श्रेष्ठ देव झाल्या मुळें वरुणाचें महत्त्व कमी झालें व शेंवटीं तर तो नुसता समुद्राच। पति म्हणजे हल्लींचा 'नेप्च्युन' ग्रह ठरला.



—०—

~~वेदांतील काही वैदिक कथानके~~

कथानके

देव आणि अग्नि विभक्ती:-

देव व दैत्य एकदां भांडत होते. तेव्हां
दैत्यांकडून आपला पराभव झाला तरी आपली
संपत्ती व ऐश्वर्य सुरक्षित रहावें म्हणून
देवांनी आपलें सर्व ऐश्वर्य अग्नीच्या ठिकाणीं
ठेवलें. त्या ऐश्वर्याचा अग्नीला लोभ
सुटून अग्नि देवांपासून दूर निघून गेला:
देवांनी दैत्यांचा पराभव केला व आपलें
ऐश्वर्य अग्नीपासून
परत घेण्याची त्यांना इच्छा झाली. त्यांनी
अग्नीचा शोध लावून त्याच्यापासून आपली
ठेव परत घेण्याची पराकाष्ठा केली.

233

अग्नी रडूं लागला, व त्या वेळीं त्याचे 'रुद्र' असें 'रडका' हें नांव प्राप्त झालें. अग्नीच्या डोळ्यांतून रडतांना जो अश्रुबिंदु पडला त्यापासून रुप्याची उत्पत्ति झाली, म्हणून रुपें ही धातु दानकर्मास निषेध गणतात. अग्नीनें त्या ऐश्वर्याचा थोडा भाग मिळावा म्हणून देवांची प्रार्थना केली. देवांनी 'पुनराधान' हें अग्नीस दिलें. व आपलें ऐश्वर्य परत मिळविलें. वरुण: त्यांची भरभराट झाली.

सूर्य व अग्नी:- सूर्याला भूमीवर उदय पावल्यावर मृत्यूचें फार भय वाटलें, कारण पृथ्वीवरील

सर्व वस्तु येथें असतात. व त्यांचा नाश अवश्य होतोच. सूर्यानें अग्नीची स्तुति केली व आपणे प्रसन्न होवून अग्नीनें सूर्याला अमरत्व दिलें.

२३७

वराह अवताराचें मूळ :- या सृष्टीच्या पूर्वी पर्वत, समुद्र, नद्या वगैरे कांहींच नव्हतें. सर्वत्र फक्त पाणीच होतें. प्रजापतीनें जग निर्माण करण्यासाठीं विचाररूप तप केलें. तेव्हां त्या अफाट पसरलेल्या जलसमूहांत प्रजापतीला लांब असा देंठाला चिकटून असलेलें एक कमळाचें पान दृष्टीस पडलें. त्या बरोबर त्यानें

234

तर्क केला कीं, या कमळाच्या देंठाला आश्रयभूत अशी वस्तु पाण्याच्या तळाशीं असावी. मग प्रजापतीनें डुकराचें रूप धारण करून त्या कमळाच्या देंठाच्या रोखानें पाण्यांत बुडी मारली. पाण्याच्या तळाशीं गेल्यावर त्याच्या हाताला भूमि लागली. तेव्हां त्यानें आपल्या तीक्ष्ण दाढेनें त्या भूमी पैकीं कांहीं चिखलासारखा भाग उकरून मोकळा करून घेतला व त्यासह तो उसळी मारून पाण्याच्या वर आला, आणि त्यानें खालून आणलेल्या भूमीचा अंश पूर्वी दिसलेल्या कमळाच्या पानावर पसरून ठेवून दिला. अशा रीतीनें

कमळाच्या पानावर भूमी पसरली गेली
म्हणजे प्रथन पावली म्हणून तिला पृथ्वी
हे नांव पडलें.

अष्टपुत्रा अदिति :-

अदितीला आठ पुत्र झाले. त्यापैकीं सातपुत्रांना
घेऊन ती देवांजवळ गेली. आठवा पुत्र जो 'मार्तंड'
त्याला तिनें टाकून दिलें. कारण तिला सातच
पुत्रांची आवड होती. व फक्त सातच पुत्र असावेत
अशी तिची इच्छा असावी. '~~सप्तपुत्रा सौभाग्यवती~~'
म्हणावें अशी तिची आवड होती. पण
आठवा पुत्र जो मार्तंड हा अज्ञातपणानें निपजला
व पुढें तो तिचा आवडता ठरला व मग तिला
'अष्टपुत्रा सौभाग्यवती' हें असें म्हणून घेणें

आवडूं लागते. त्या वरून पुढें सर्व स्त्रियांना 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' हा आशीर्वाद देण्याची रूढी पडली असावी.



## राक्षसांचें सूर्याशीं युद्ध:-

राक्षसांनी उग्र तपश्चर्या करून प्रजापतीला प्रसन्न केलें व त्याच्या जवळून सूर्याशी लढण्याचें सामर्थ्य प्राप्त करून घेतले तेव्हां पासून सर्व राक्षस सूर्याच्या गतीस अडथळा आणण्यासाठीं व प्रजेला प्रकाश मिळूं न देण्यासाठीं अर्थात् सूर्य उगवल्या पासुन मावळे पर्यंत त्याच्याशीं लढत असतात. त्या राक्षसांचें निवारण करण्यासाठीं ब्रह्मवादी महर्षी पूर्वाभिमुख उभे राहून गायत्री मंत्राने मंतरलेले पाणी

आकाशांत फेंकतात. त्या पाण्याचे बिंदु
व ग्ररूप बनून सूर्याशी लढणा-या
राक्षसांना लागतात व त्यामुळें नित्य नित्य
राक्षसांचा पराजय होत असतो. (व आपल्याला
प्रकाश मिळतो, म्हणून नित्य अर्घ्यप्रदान करीत जावें.)

नरक :-

वेदांत चार प्रकारचे नरक दिले आहेत.
१ विसर्पी, २ अविसर्पी, ३ विषादी व, ४
अविषादी.

जगाची उत्पत्ति :-

प्रजापतीला विश्वाची उत्पत्ति करण्याची इच्छा
झाल्या वरून त्यानें उग्र तप केलें व तीन लोक
उत्पन्न केले. त्याच्या तपाच्या तेजानें -

अग्नि, वायु, आदित्य; ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद; तीन लोक (भूः भुवः स्वः); तीन अक्षरें (अ. उ. म्.); हीं उत्पन्न झाली. व त्या पासून पुढे सृष्टी निर्माण झाली.

239

मत्स्यावताराची मूळ कथा :-

सूर्यवंशांतील मनु प्रजापति एके दिवशीं प्रातःकाळी संध्या करीत असतां त्याच्या अर्घ्यांत एक मासा आला. त्या मत्स्यानें भावी जलप्रलयाची कथा मनूला सांगितली. व आपण मोठा होईपर्यंत संभाळण्याचें आश्वासन मनूपासून घेतलें. प्रलयाचे

वेळीं याच मत्स्याच्या साह्यानें मनु बचावला.

मनूला बचाविण्या साठीं याच मत्स्यानें 280

एक नौका आणावेळी व त्यांत मनूला

घालून उत्तर गिरीवर नेलें. तेथें इडा

देवी बरोबर मनूचा विवाह झाला, व त्याच्या

पासून जी प्रजा उत्पन्न झाली तीच 'मानव'

जाति होय.

वेदांची उत्पत्ति:- प्रथमत: सृष्टीच्या आरंभीं

परमेश्वरानें अग्नि, वायु, आदित्य व अंगिरा या

ऋषींच्या आत्म्यामध्यें एका एका वेदाचा प्रकाश केला.

या चार ऋषींपासून ब्रह्मदेवानें चारही वेदांचें

ग्रहण केलें.

कूर्मावताराचें मूळ:-

शतपथ ब्राह्मणांत प्रजापति संतति निर्माण करण्या करतां जला मध्यें कूर्म रूपानें संचार करतो असें सांगितलें आहे.

---

१३ वेद व यज्ञसंस्था.

सामाजिक वा राष्ट्रीय हित साधावयाचा बाणा बाळगणार जे जे विधि जगांत निर्माण झालेले आहेत त्या सर्वांत - यज्ञसंस्थे इतके महत्वाचे व जुनें दुसरे कोणतेच नाहींत. यज्ञसंस्था म्हणजे राष्ट्रीय व सामाजिक उन्नति, हाच काय तो वेदाचा विषय आहे. वेद निवृत्तिपर नाहींत. ते पूर्ण प्रवृत्तिपर आहेत. आधीं पूर्ण प्रवृत्ति व नंतर निवृत्ति हाच वेदाचा क्रम आहे. चार वेद, ब्राह्मण ग्रंथ व आरण्यकें या सर्वांचा हेतु धर्माच्या अधिष्ठानावर जागतिक उन्नति करणें हाच आहे.

सर्व वर्ण अत्यंत प्राचीन काळापासून यज्ञ करीतच होते. त्यांचे प्रकार मात्र निरनिराळे होते. त्या सर्वांचा बुद्धिभेद न करतां त्यांच्याच कर्मांपासून त्यांची उन्नति करवावयाची हाच सरळ व सोपा हेतु वैदिक ग्रंथांचा होता. प्राचीन काळीं राष्ट्रें लहान लहान टोळया सारखीं होतीं. त्यांना एकत्र जोडणाऱ्या संस्था नव्हत्या. ती उणीव यज्ञ संस्थांनीं भरून काढली. घरोघरचे अग्निहोत्र किंवा सात्विक वैयक्तिक धर्माचरण कमी करवून सामुदायिक यज्ञ कर्में करावीत व समाज एकत्र करावा हाच यज्ञसंस्थेचा मूळ हेतु होता. यज्ञांत लौकिक भाग व

उपासना यांचें मिश्रण आहे. यज्ञ संस्थांनी परस्पर भिन्न असे व्यवहार, चालीरीति, यांची संगति लाविली. जत्रा, प्रदर्शनें, समीत्या वगैरे यज्ञ प्रसंगानेंच उपास्थित झाल्या. एकंदरींत यज्ञ हा सर्व व्यवहारांचा समुच्चय आहे, व तो राष्ट्राराष्ट्रांचें ऐक्य करणारा आहे. यज्ञानें सर्व मनोरथहि पूर्ण होतात. यज्ञाचें अंतिम ध्येय जरी —

" स्वर्गकामोयजेत " म्हणजे स्वर्ग प्राप्त करून घेण्याची इच्छा असेल त्यानें यजन करावें म्हणजे यज्ञ करावेत, असें असलें तरीपण ऐहिक स्वातंत्र्य व सुख पूर्णपणें भोगणें

हेंच यज्ञाचें मुख्य ध्येय दिसतें. लहानांत लहान अशा दर्शपूर्ण मासेष्टीचाच विचार केला तर त्यांत गांव इनाम मिळावें, पुत्रप्राप्ति व्हावी, नातुरोण्यापासून रक्षण व्हावें, धान्याचा पुरवठा पुष्कळ व्हावा, पाऊस पडावा, धन प्राप्त व्हावें, सर्व प्रकारचे रस मिळावेत, शरीर सदृढ रहावें, शरीर निरोगी असावें, रोग नाहींसे व्हावेत, तेज-बळ-शौर्य हीं वाढावीत, युध्दांत जय मिळावा, दीर्घायुषी व्हावें, गाई व माणसें मुबलक वाढावीत, शत्रूंचा नाश व्हावा, राक्षसांचा उपद्रव नसावा, समाज

बळकट होऊन समाजाची उन्नति व्हावी,
संघटन शक्ति वाढावी, ऐक्य व प्रेम
उत्पन्न व्हावीत, भाऊबंदकी नसावी,
राष्ट्राची वृद्धि व्हावी, वगैरे प्रकारच्या
कामना पूर्ण होण्यासाठीं दर्शपूर्णमासेष्टी
वगैरे अवश्य करावीत असा त्यांचा हेतु
दिसतो. म्हणजे एकंदरीत ऐहिक सुख व
पूर्ण स्वातंत्र्य भोगून शेवटीं मोक्ष प्राप्त
व्हावा हेंच यज्ञाचें प्रयोजन ठरतें व
त्यामुळेंच यज्ञ संस्थांना फारच महत्त्व
प्राप्त झालेले होतें. व्यावहारिक दृष्टीनें
थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे यज्ञसंस्था ह्या विद्वान्, शूर,
स्वावलंबी, परोपकारी व सद्गुणी पुरुष निर्माण करणाऱ्या
संस्था आहेत.

२५९

या यज्ञसंस्थांचें अशा तऱ्हेचें महत्त्व असल्यामुळेंच प्राचीन कालांपासून आर्यांच्या याच संस्था नष्ट करण्याकरितां राक्षसांनीं म्हणजे अनार्यांनी प्रयत्न केले. ऐतिहासीक कालांतहि यवनांनीं व परकीयांनीं याच संस्कृतीचा उच्छेद करण्याचेच प्रयत्न केलेले आहेत व त्यापाहि करीत आहेत. [illegible] आर्यांनीं ही संस्कृति जितकी पोसली जाईल तितकी ती पोसली तरच त्यांचा उत्कर्ष होणार आहे. नाहीतर अधोगती होतच चालली आहे.

१४ रेशन कार्ड विध्वंसक इन्द्र.

मनुष्याच्या सभोंवार असणारे सर्व नैसर्गिक दृग्विषय व नैसर्गिक घटना हीं सचेतन व दैवी आहेत ही श्रद्धा फार प्राचीन काळा पासून चालत आली आहे. त्या प्रमाणें 'द्यु' (आकाश) व पृथ्वी यां पासून इंद्राची उत्पत्ति झाली असें म्हटलें आहे. (पुराणांत कश्यप व आदितीचा हा पुत्र म्हटला आहे.) जन्मतःच इंद्रानें सोमरसाचें पान केलें. युद्ध करण्यासाठीं एका असामान्य पुरुषानें एका वीर पत्नीच्या पोटीं एक असामान्य पुरुष

...त्रा तोच इंद्र.

२४१

इंद्राच्या उत्पत्तिकाळीं विश्वाची परिस्थिति फारच बिकट होती. त्या वेळीं परमेश्वराची सृष्टीचानाश करण्यासाठीं, अनर्शनि, अर्णव, अर्बुद, आहि, अहिशुव, अश्न, इलीविश, उरण, कारंज, कुयव, कौलितर, क्रिवि, चुमुरि, आतुलिरा, दृभीक, धुनि, नमुचि, नववास्त्व, नाभीर, पद्गृभि, पर्णय, पिप्रु, पिशाची, मरव, मृग, रुधिक्रा, रौहिण, वनगृह, वार्चिन, वल, वृकद्वरस, वृत्र, वृशाशिप्र, व्यंस, चण्डिक, शंबर, शुष्ण,

स्वर्भानु, वगैरे राक्षसांनीं जणूं विडोच उचलला होता, व ते सृष्टीतील सर्व - २५०
प्राण्यांना जणूं काय 'सवू कां पवू' करून सोडीत होते. सर्वांचे जीव धोक्यांत होते. रक्षणाची साधनें अपुरी होती. परस्पर दळण वळण बंद पडलें होतें. हल्लींच्या - जागतिक युध्दांत 'रेशन कार्ड' मुळें तरी मानवांचा जीव वांचतोय, परंतु त्या काळीं रेशन कार्डाच्याही पली कडे परिस्थिति गेली होती. कारण सर्वच पदार्थ दुर्मिळ झाले होते. शत्रूंनीं हवा दूषित केली.

ऋषींच्या मनांत प्रेम, भक्ति, स्वामिनिष्ठा
उत्पन्न होण्यास इंद्राचा एकच पराक्रम
कारणीभूत झाला तो हाच कीं त्यानें
प्रकाश, उदक, अन्न हीं लोकांना
मुबलक मिळतील ही व्यवस्था प्रथम
करून रेशन कार्डाच्या संकटांतून सर्व
प्राण्यांना सोडविले. पाणि, वल, अहि
इत्यादि जबरदस्त व्यक्तींनीं प्रकाशाचे
किरण बाहेरील जगास बिलकूल लागूं
नयेत अशी सक्त खबरदारी घेतली
होती. त्यांनीं उदकांना न वाहण्याचा -
हुकुमाचा हुकूम सोडला होता. रसपान

करविणाऱ्या सरितांना नागांचें हलूं देवूं नये असें शुष्ण, वल, अहि यांचें धोरण होतें. हे राक्षस फार बुद्धिमान् होते. ते फार पराक्रमी होते. ते युक्तिबाज होते. त्यांची बुद्धि खोटी होती. त्यांची वासना दुष्ट होती. त्यांची मति विपरीत होती. त्यांच्या दुष्टपणामुळें सर्व प्रकारची प्रवृत्ति गारठून गेली होती. सर्व प्रकारच्या कार्यक्षमतेला हुडहुडी भरली होती. सर्व क्रिया अक्रिय बनल्या होत्या. सर्व कर्तृत्व थंडावून गेलेलें होतें. सर्व चलन अचलन बनलें होतें. सर्व पुरोगतीस परागतीचें स्वरूप

आलेले होते. सर्वांच्या मेंदूची क्रिया बंद
पडली होती. हे राक्षस जगांस, पाणी 
नसतांना बुडविणार, उष्णता नसतांना जाळणार.
गुदमरवणारें असें सर्वांस वाटूं लागलें होतें; व त्यांना
आळा घातल्या शिवाय जग चालणें शक्य नाहीं
हें उघड उघड नजरेस येऊं लागलें होतें.
प्रकाशासाठी हपापलेल्या विश्वाचें रक्षण
करणें त्या वेळीं अगदीं आवश्य होतें. हें
रक्षण इंद्रानें केलें म्हणून इंद्राची एवढी
थोरवी वेदकाव्यांत गाइली गेली.
या विश्वांत प्रकाश व उदक यांना इंद्रानें
मनमुराद चोहोंकडे पसरूं दिलें हाच इंद्राचा

सर्वांत मोठा पराक्रम होय. हा पराक्रम इंद्राने केला म्हणूनच त्याच्यावर सर्व वैदिक ऋषींच्या प्रेमकाव्यांची वृष्टि झालेली आहे. ह्या इंद्राच्या नांवाचें अजूनहि स्मरण ठेवणाऱ्या इंन्द्वीपाचें (इण्डियाचें - हिंद भूमीचे) कोणता वैदिक धर्माभिमानी पुरुष अभिनंदन करणार नाही? अर्थात् सर्वच या हिंदभूमीचे अभिनंदन करतील.

२५६

—०—

१५ ~~२५८~~

~~हें~~ आपण काय ~~हि~~ ~~काय~~

पूर्वीपासून आणि हल्ली दाखविले

^ सुधारलेल्या सर्व राष्ट्रांनीं पर्यायानें २५८

इंद्र, वरुण, अग्नि, वायु व पृथ्वी या

निसर्ग देवतांचें भक्तीनें आराधन करूनच

आपलें कल्याण करून घेतलेलें आहे.

म्हणून आपणहि वैदिक देवतांना क्षुल्लक

न मानतां त्यांची परिचर्या करण्यांतच

राष्ट्राचें कल्याण आहे हें साक्रिय

सिध्द करून दाखविणे, हेंच आपलें

ध्येय ठरतें व हाच आपला धर्म आहे.

(दाखविलें)

१९ ~~२८~~ राष्ट्रीय प्रार्थना २५८

(शुक्लयजुर्वेद. अध्याय २२ कंडिका २२)

हे ब्रह्मन्, आमच्या राष्ट्रांत अध्ययनशील व ब्रह्मतेजाने संपन्न असा ब्राह्मण उत्पन्न होवो. आमच्या राष्ट्रांत शूर, अचूक बाण मारणारा, शत्रुशरीराचा चुराडा करणारा, व शत्रुपक्षाकडील एक हजार रथींचा पराभव करणारा असा महारथी क्षत्रिय उत्पन्न होवो. आमच्या राष्ट्रांत अत्यंत दुधाळ गाय, पुष्कळ ओझें वाहणारा बैल, जलद चालणारा घोडा आणि सर्वगुणसंपन्न अशी स्त्री उत्पन्न होवो. या यजमानास

जयशाली, रथांत बसणारा, सभापंडित: 2

आणि तरुण असा पुत्र होवो. आमच्या राष्ट्रांत जेव्हां जेव्हां इच्छा तेव्हां तेव्हां पाऊस पडो. आमच्या राष्ट्रांतील सर्व प्रदेशांत असलेले आम्रपनसादि वृक्ष फलभाराने लवून जावोत व सर्व शेतांमध्ये सर्व प्रकारची धान्यें अनायासें पिकोत. आमच्या राष्ट्रांत असणाऱ्या सर्व प्राण्यांचा यो[illegible] अप्राप्त वस्तूची प्राप्ति) व क्षेम ([illegible]प्राप्त वस्तूचें संरक्षण) उत्तम प्रकारें चालो.

शांति: शांति: शांति:

—०—

